

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५५ । अंक ७ । एप्रिल २००२
फाल्गुन-चैत्र, शके १९२३-२४
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)









अनुक्रमणिका

# नवभारत

अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

# गुजरातमधील हिंसाचार आणि सत्यक्रियेचे दिव्य

**वसंत पळशीकर**

गोध्रा स्टेशनात साबरमती एक्स्प्रेस पोचल्यावर काय घडले त्याच्या तपशीलवार हकीकती प्रसिद्ध झाल्या आहेत. गाडीचे एक-दोन डबे पेटवून देण्याइतका मुस्लिम जमाव पागल का झाला त्याची काही कल्पना हकीकतींवरून येते.

घटनांची मालिका कोठून विचारात घ्यायला सुरुवात करावयाची हा नेहमीच नाजुक, विवाद्य व स्फोटक मुद्दा असतो. पुष्कळदा, कोणाला दोषी/अपराधी ठरवावयाचे हे आधीच ठरलेले असते; कारण तो व्यापक दीर्घकालीन भूमिकेचा भाग असतो. मग त्या निष्कर्षाप्रत आपण बुद्धिवादी तर्क व युक्तिवाद यांद्वारा पोचलो आहोत हे दाखविता येईल अशा बिंदूपासून घटनांच्या मालिकेची सुरुवात केली जाते.

घटनांची मालिका कोठून सुरू करावयाची व कोठे संपवावयाची यासाठी जर काहीशा अक्कलहुशारीने कंस घालून घेतले तर त्या आरेखित चौकटीत दोष/अपराध निर्विवादपणे एका बाजूच्या पदरात घालता येतो. याचे अगदी आपणा अनेकांना संतप्त करणारे ताजे उदाहरण, गुजरातचे मुख्यमंत्री श्री. नरेंद्र मोदी यांच्या कुप्रसिद्ध पाषाणहृदयी निवाड्याचे सांगता येईल. श्री. मोदींचा धिक्कार करणाऱ्या पक्षाचेच आम्ही आहोत. त्याच वेळी, ते जे काही म्हणाले ते क्रूर व अमानुष वाटत असले, आणि एका अंगाने ते तसे आहे असे मान्य केले, तरी ते ठणकावून सांगितले जायलाच हवे होते असे चाटणारे अगणित हिंदू गुजरातेत व देशभर आहेत ही गोष्टही विसरता येत नाही.

काय घडले? घटनांचा क्रम काय राहिला? ज्याची मोजदाद करता येईल असे नुकसान किती झाले, कोणाचे झाले? या स्वरूपाचे माहितीचे, संख्यात्मक मोजमापाचे, तथ्ये/घटिते यांच्या नोंदणीचे काम होऊ शकते. वस्तुनिष्ठ स्वरूपात होऊ शकते. पण जे आपण वस्तुनिष्ठ चित्रण, निवेदन, विश्लेषण व विवेचन मानतो तेही हितसंबंधांमुळे, पूर्वग्रहांमुळे, उघड व प्रच्छन्न उद्दिष्टांमुळे, व्यक्तिगत पसंती-नापसंती, लहर अशा अनेकानेक कारणांमुळे कसे आत्मनिष्ठ, पक्षपाती व विपर्यास/सत्यापलाप करणारे असते; जे दिसावयास निरागस, साधेसरळ वाटते तेही कसे छद्मी असते हे उघड करून दाखविण्यावर भर देणारा, 'जे दिसते त्याच्या पोटात काय दडलेले असते' ते स्पष्ट करू पाहणारा एक पूर्ण विचारव्यूहच आज प्रतिष्ठित व वजनदार बनलेला आहे. 'कन्स्ट्रक्शन-डिकन्स्ट्रक्शन' ही या विचारव्यूहाची चिकित्सक दृष्टी व चौकट आहे असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. कोणाचेही कोणतेही म्हणणे असेल, लेखन असेल, वक्तव्य असेल तर त्याची चिरफाड करता येत असल्याने, ही रीत अवलंबण्याचा, तिला प्रामाण्य बहाल करण्याचा दूरगामी परिणाम बौद्धिक जीवनावरच केवळ झाला आहे असे नाही; तर सामाजिक व वैयक्तिक जीवनावरही झालेला आज आपल्याला अनुभवाला येतो.

दोन व्यक्तींमधील, समुदायांमधील वा जमाती/समाज यांच्यामधील बोलणे-वागणे-कृती, प्रत्येकच व्यवहार हा सत्ता संपादण्या-गाजविण्याच्या चौकटीत होत असतो (जीत होईल वा पराभव होईल हे वेगळे), असे वरील विचारव्यूहाचे पायाभूत व अविचल असे गृहीतक (axiom) आहे. सर्वांसाठी, स्थलकालातीत असे सत्य वा शिव वा सुंदर असे काही नसतेच; असते केवळ आपला स्वार्थी हितसंबंध साधण्यासाठी सोयीस्कर अशी मांडणी, दावा वगैरे. सत्य वगैरे काही नसते; सगळा सत्ता व स्वार्थ यांसाठीचा संघर्ष/खेळ चाललेला असतो, व्यवहारावर चढविलेले सोयीस्कर साज व मुखवटे दूर केले की वास्तव उघड होते, जे न-नैतिक असते, अशी भूमिका आपल्याला तर्काच्या वाटेने एका कडेलोटाच्या टोकाशी घेऊन जाते.

दंगल मालेगावची असो वा गुजरातमधील, वा १९९२-९३ सालची मुंबईतील, आपल्याला फाळणीच्या वेळच्या भीषण, अमानुष हत्याकांडाची, जाळपोळ, लुटालूट, बलात्कार, क्रौर्य, स्वार्थांधता यांची आठवण येऊ लागली आहे. सत्तास्पर्धा, स्वार्थी हितसंबंध, भांडणतंटे या सगळ्यांना पोटात घेऊन भारतात एक समाज म्हणून आपले सर्वांचे प्रदीर्घकाळ अस्तित्व होते. आसेतु-हिमाचल, हिंदू व मुसलमान (आणि येथील

अनुक्रमणिका






एतद्देशीय अन्य धर्मीयही) दोघांनाही आपण एका देशाचे व समाज-संस्कृतीचे आहोत हा अनुभव होता. पण गेल्या शतकात आपण एक वाट धरली ज्या वाटेने चालता चालता या देशातल्या हिंदू-मुसलमान समाजांमध्ये दरी उत्पन्न झाली, आणि ती उत्तरोत्तर रुंदावत गेली. अनुल्लंघनीय झाली.

आपल्या सवयीप्रमाणे आपण बहुतेकजण यासाठी ब्रिटिश राज्यकर्ते, मुस्लिम लीगचे नेते व त्यांचे राजकारण, आणि सर्वाधिक अधिक जीना यांना दोषी धरतो. असे करीत असताना आपले ध्यान गांधी-नेहरूंच्या नेतृत्वावर, त्यांच्या विचारांवर व भूमिकांवर केंद्रित होते. पण अलीकडे पुष्कळ अभ्यास झाले आहेत. त्यांवरून आपल्या ध्यानात इतके तर नक्कीच येते की, ज्यांना हिंदू असे म्हणू त्याच्याही पदरात दोष जातो.

मुद्याची गोष्ट अशी की, या दोन समाजांमधला परस्पर-संवाद संपुष्टात आला, आणि सामाईक व सार्विक असे याबाबतीत सत्य असे काही नाही, सत्तेचा खेळच (ब्रिटिशांच्या हाती तराजू होता) सारा आहे अशी भूमिका रुजली तेव्हा एका समाजाचे व एकराष्ट्रीयत्वाचे अधिष्ठान उखडले गेले. समाजाचे या प्रकारे विघटन होते तेव्हा पिढ्यान्‌पिढ्या एकत्र राहिलेल्या लोकांमध्ये परस्परांविषयी षड्‌विकारांचा एकदम स्फोट झाल्यासारखे होते. गेल्या पन्नास वर्षांमध्ये जगभर याची ठळक भयावह उदाहरणे सापडतील. पण आपल्याला आपल्या देशाबाहेर जायची जरूर नाही. मोठ्या भूकंपानंतर पुष्कळदा त्या भागात अनेक दिवस लहान-मोठे धक्के बसत राहतात. सगळे मिळून वस्तुतः एकच घडामोड असते. फाळणीच्या त्या दीड-दोन वर्षांमध्ये विकारांचे थैमान आपण देशाच्या एका भागात अनुभवले. पण मने तर देशभर विकारग्रस्त झालेलीच होती.

महात्मा गांधींच्या हौतात्म्यामुळे आपणांस चाळीसएक वर्षे मिळाली. रोग शरीरात व मनात दाबला गेला. पण संवाद तुटलेलाच राहिला आणि समाजाचे अधिष्ठान उखडलेलेच राहिले. एका बऱ्यापैकी उदार व समंजस अशा राज्यघटनेच्या आधारे औपचारिक पातळीवर आपण एक राष्ट्र-राज्य प्रस्थापित केले. आपण तेव्हापासून या भ्रमात आहोत की राज्यघटना समाजाला अधिष्ठान पुरवते. राज्यघटना वास्तविक आपल्या संदर्भात कारभारविषयक नियम व रीती सांगणारी हस्तपुस्तिका असल्यासारखी आहे. ती समाजाचे अधिष्ठान म्हणून लोकांनी स्वतःसाठी घडविली व प्रस्थापित केली अशी वस्तुस्थिती नाही. घटनापरिषदेतल्या चर्चा दांभिक वा खोट्या नव्हत्या. पण फाळणीच्या वेळी जे आपल्या समाजाचे वर्तन घडले ते जणूकाही विसरून, त्याची उपेक्षा करून आपल्या विद्वान पंडितांनी एक 'आदर्श' पुस्तकी घटना तयार केली. ती स्वीकृत केल्यानंतरही ती लोकांनी खऱ्या अर्थाने स्वीकृत करण्याची प्रक्रिया कोणी ध्यान देऊन घडविलीच नाही. ती स्वीकृत झाली आणि आपले घोडे गंगेत न्हाले!

राष्ट्रसभेच्या नेतृत्वाखालील स्वातंत्र्यलढ्याची पुण्याई व गांधींचे बलिदान यांच्यामुळे समाजमनात व शरीरात शिरलेला रोग आटोक्यात राहिला. भुसभुशीत झालेला पाया मजबूत करण्याची गोष्ट न होता, आपल्या सर्वांचा मिळून हा एक समाज, देश व संस्कृती कशी नाहीत हे सिद्ध करणारेच समाजकारण व राजकारण, दुर्दैवाने, अलीकडच्या काळात परिवर्तनवाद्यांकडून प्रकर्ष पावत गेले.

दबल्यासारखा झालेला रोग, कॅन्सर शरीरभर पसरावा तसा, आज फैलावला आहे. आपण रोगाचा प्रादुर्भाव शरीरभर करण्याचे श्रेय (वा अपश्रेय) संघपरिवाराला देऊ नये. त्यांचा अपराध त्याहून मोठा आहे. त्यांचा अपराध रोग्याच्या रोगग्रस्त अवस्थेत भर घालून सत्तेचे राजकारण करण्याचा व या राजकारणासाठी प्रभू रामचंद्रांना वेठीला धरण्याचा आहे. ही विनाशकाले विपरीत बुद्धी आहे.

मलमपट्टीने काम होण्यासारखे नाही ही गोष्ट खरीच. समाजाला अधिष्ठान, तेही खोलवर पोचणारे व मजबूत प्राप्त करून द्यावे ही निकड आहे. चक्रावून टाकणाऱ्या विविधतेला, ताणतणावांना, कलहांना, आकांक्षांच्या विस्फोटाला विधायक वृत्तीने सामोरे जात भारताचे एकराष्ट्रीयत्व व्यवहारात साकार करावयाचे आहे. तेच भारतीय समाजाला भक्कम अधिष्ठान प्राप्त करून देईल.

सर्वांसाठी सार्विक सत्य (ज्यामध्ये न्याय स्वातंत्र्य व समता ही मूल्ये अंतर्भूत आहेत) असे काही ज्ञान असतेच असते; आणि माणसे निरंहकारी, निस्वार्थी असतात व इतरांविषयी आत्मौपम्य वृत्ती बाळगतात तेव्हा त्यांना, सहाध्यायाने व सहकार्याने मिळून ते ज्ञान प्राप्त करता येते, आणि त्यासाठी सौहार्दपूर्ण संवाद हाच मार्ग असतो, ही मनोमन खात्री असावी लागते.

महात्मा गांधींवर डिटमार रॉदरमुंड (Dietmar Rothermund) यांचे एक छोटेखानी इंग्रजी पुस्तक आहे. *Mahatma Gandhi : An Essay in Political Biography* या नावाचे. यामध्ये त्यांनी गांधींच्या सत्यविषयक दृष्टीची मूलग्राही व मार्मिक चिकित्सा केली आहे. ते लिहितात, "The quest for truth was central to Gandhi's life, but this was not the kind of truth which can be ascertained by verification according to the methods of critical scholarship. For him verification depended on deliberate action controlled by a vow. He stated that Truth is the Essence of the Vow and thus reflected the ancient Indian practice of 'satyakriya'..." 'सत्यक्रिया'ची स्पष्टता रॉदरमुंड अशी करतात : "Satyakriya means 'to make something true' and in the ancient texts it usually refers to a kind of ordeal whereby the person concerned takes an oath based on a secret truth, known only to himself, 'the person concerned acting upon it so as to be judged by God.' "

सत्य काय ही केवळ तटस्थ निरीक्षणाद्वारे आपणांस कळणारी गोष्ट नाही. वैज्ञानिक, वस्तुनिष्ठ या शब्दांचा आपण वापर करतो तेव्हा तथ्य, घटित, नियम अशा स्वरूपात सत्य हाती येण्याची गोष्ट आपण करीत असतो. पण जेथे 'सत्या'ला नैतिकतेचे, शिवत्वाचे, मांगल्याचे परिमाण प्राप्त असते तेथे गोष्टी वा संबंध वा वर्तन वा उक्ती इत्यादींच्या संबंधात 'कसे असायला हवे' 'कसे असणे अधिक खोलवर अर्थाने सत्य आहे' हा पदर त्याला असतो. शेजाऱ्यांमध्ये हेवेदावे, भांडणे, अगदी कोर्टकचेरीपण आढळते. तथ्याच्या पातळीवर वास्तव आपण स्वीकारतो; पण त्याच वेळी 'हे काही खरे नाही; शेजारधर्माने वागणे हेच खरे' असे म्हणतो.

इतिहासाचा धांडोळा घेऊन आपल्याला हे 'सत्य' गवसत नाही. इतिहास ही गोष्ट अशी आहे की, पुष्कळदा, तो जसा शोधावा, समजून घ्यावा तसा दिसतो, समजतो. कारण आपण अनेकानेक घटना, उक्ती-कृती यांच्यामधून एक आकृतिबंध शोधत, बघू पाहात असतो, आणि त्यासाठी काही वेचक गोष्टींवर ध्यान देतो, इतर हकीकती वगळतो. दृष्टी, आवाका, वकूब, हेतू, उद्देश, साध्ये, ग्रह-पूर्वग्रह या सगळ्यांमधून इतिहासकाराने निर्माण केलेला 'इतिहास' आकारास येत असतो. गांधींनी जेव्हा म्हटले की, 'Truth transcends histroy' तेव्हा त्यांचे म्हणणे अर्थपूर्ण होते.

गोध्रा स्टेशनवर काय घडले, गुजरातेत काय घडले व घडत आहे या विषयी 'शोध पत्रकारिते'च्या भूमिकेमधून वा इतिहासकाराच्या भूमिकेमधून पुष्कळ तपशिलात खोलवर आपण गेलो तरी, एका मर्यादेनंतर, वर्तमानाचा क्षण 'पकडण्या'च्या दृष्टीने त्याची उपयुक्तता सीमितच राहते. ज्यांचे नुकसान झाले त्यांना भरपाई द्यावी, अपराध्यांना शासन केले जावे, मुखमंत्र्यांनी (व केंद्रीय गृहमंत्री) यांनी राजीनामा द्यावा वगैरे मागण्या त्यांच्या त्यांच्या जागी ठीकही आहेत. पण अशा उपायांनी हिंदू-मुस्लिम ऐक्य अस्तित्वात येणार नाही. एका पातळीवर न्याय, 'कायद्याचे राज्य', 'राज्यकर्त्यांकडून त्यांच्या कर्तव्याचे पालन' यांसारख्या गोष्टी साध्य होतील, आणि त्याचेही महत्त्व आहे, नाही असे नाही. पण मुख्य गोष्ट ती नाही.

पूर्वीच्या काळी स्वतःचे म्हणणे खरे आहे हे सर्वांना दाखवून देण्यासाठी व्यक्तीला पंचांच्या साक्षीने दिव्य करावयास सांगितले जाई. छळ, दडपणूक, कपट-कारस्थान, हिंसाचार, बळ यासारख्या साधन-मार्गांनी दुसऱ्या व्यक्ती चा समूह यांना आपले म्हणणे मान्य करावयास लावणे ही 'सत्यक्रिया' मानली जात नाही; सत्तेच्या जोरावर बळजबरीने जे साध्य केले जाते, किंवा पैशाच्या जोरावर जे विकत घेतले जाते ते सत्य ठरत नाही, ही ध्यानात घेण्याची गोष्ट आहे. सत्य ही नैतिक-आध्यात्मिक गोष्ट आहे ही पायाभूत मान्यता आहे असा याचा अर्थ.

दिव्य करावयाचे याचाही अर्थ जाणून घेण्यासारखा आहे. ज्या पंचांच्या साक्षीने दिव्य करावयाचे असते त्यांची धारणा अशी असते की, सत्य-असत्याचा निवाडा ईश्वर करणार असतो. ईश्वर म्हणजे अशी शक्ती की जी निरहंकारी, निर्विकार, निर्मम, भेदाभेद न करीत सर्वांविषयी समत्वबुद्धी व सद्भाव बाळगणारी व म्हणून न्यायी असते. दिव्य करणाऱ्या व्यक्तीने 'सत्य-असत्यासी मन केले ग्वाही' या मनोभूमिकेमधून आत्मक्लेशाची स्वेच्छा तयारी दाखवायची असते. क्लेश अर्थातच आत्म्याला होत नाहीत, ते वासनाविकारयुक्त देहाला होतात. 'मी खरे तेच म्हणत असेन तर दिव्याची कसोटी

सुखरूपपणे पार पाडीन ही खात्री आहे, कारण ईश्वर न्यायी आहे' अशी त्या व्यक्तीची भूमिका असते.

या देशात राहणाऱ्या व या देशाचे असणाऱ्या सर्व विभिन्न व्यक्ती व समूह, जाति-जमाती, धार्मिक समुदाय यांचे अंतःकरणापासून ऐक्य हे आजच्या घडीला वास्तव तथ्य नाही. आपापसातील अलगाववृत्ती, फाटाफूट, कलह, हेवेदावे, परस्परांविषयी तिटकारा व घृणा – या व अशा अनेक अनुभवाच्या गोष्टी आहेत. या समाजाला स्वतःचे असे खोलवरून, आतून येणारे एकराष्ट्रीयत्वाचे अधिष्ठान आहेच आहे, कारण तेच सत्य आहे, अशी ज्यांची प्रतिज्ञा (vow) आहे त्यांना वर्तमानात सत्यक्रिया करावयाची आहे. Satyakriya means to make something true. कल्पनेच्या, ध्येयाच्या, उद्दिष्टाच्या अमूर्त व मानसिक पातळीवर नव्हे तर 'याचि देही याचि डोळां', लौकिक व्यवहारात. आपण अशा एका टोकाला येऊन पोचलो आहोत की ज्यांचे हे सत्याचे दर्शन असेल त्यांना मोठे दिव्य दीर्घकाळ करायला हवे आहे.

सत्यक्रियेचे आपल्या डोळ्यांसमोरील नमुनेदार उदाहरण महात्मा गांधींचे आहे. एका पातळीवर, हिंदू-मुस्लिम ऐक्य हे केवळ स्वप्नरंजन ठरले होते; आणि देशाची केवळ फाळणीच केली गेली नव्हती तर उत्तर भारतात या दोन जमातींमध्ये 'माणुसकीचा मुडदा पडला' म्हणावेसे वाटण्याइतका व त्या रंगरूपाचा हिंसाचार माजला होता. हा देश, व या देशातले लोक एकाच भूमीचे व संस्कृतीचे वारसदार आहेतच आहेत; जे आपल्या डोळ्यांदेखत घडतंय ते वास्तव आहे पण ते असत्य आहे, याविषयी गांधी निःशंक होते. लौकिक जीवनात ते सत्य मूर्त करण्याची त्यांची प्रतिज्ञा होती. कलकत्ता-नोआखाली-बिहार-दिल्ली या सगळ्या ठिकाणी ते दिव्य पार पाडीत होते. त्यातच ब्रह्मचर्याच्या बाबतीत स्वतःचे उणेपण तपासून पाहण्याचे दिव्यही आपण समाविष्ट केले पाहिजे.

भीषण दंगलीच्या ऐन मध्ये जीव धोक्यात घालून दंगलखोरांना रोखण्याचे काम पं. नेहरूंनी पहिले हंगामी पंतप्रधान झाल्याझाल्या केल्याचे, संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाच्या ओघात मुंबईत उसळलेल्या दंगलीच्या वेळी एसेमनी इन्स्पेक्टरचे प्राण वाचविल्याचे आपणांस माहीत आहे. असे अनेकानेक अनामिक वीर स्त्री-पुरुष होऊन गेल्याचेही आपणांस माहीत आहे. गांधी पार पाडीत असलेले दिव्य हे नव्हते. पीडित-दुःखितांची कीव न करता सन्मानपूर्वक त्यांच्याशी तसेच त्यांना पीडा व दुःख देणाऱ्यांशीही संवाद करणे हे दिव्य ते पार पाडीत होते. कलकत्त्याची कत्तल व नोआखालीतले हत्याकांड ज्यांनी संघटित व प्रोत्साहित केले त्या सुऱ्हावर्दीशी, जे घडले त्यावर पांघरूण न घालता, संवाद करीत शांती प्रस्थापनेच्या, मने निर्वैर व निर्भय बनविण्याच्या कृतीत त्यांना साथी करून घेणे हे दिव्य होते.

गांधींचा खून झाला आणि त्या धक्क्याने परिस्थिती निवळली. नंतरच्या वर्षांमध्ये दंगली होत राहिल्या, पण स्थानिक तात्कालिक बिघाडाचा परिणाम असे त्यांचे स्वरूप राहिले. पण अहमदाबाद, भिवंडीपासून, म्हणजे साधारणपणे १९७० च्या आसपास दंगलीसाठी निमित्तही शोधले वा निर्माण केले जाऊ लागले आणि मुसलमानांना धडा शिकविणे, मुसलमानांना इथे राहणे अवघड करून सोडणे, राष्ट्रद्रोही म्हणून त्यांच्याविरुद्ध द्वेष वाढविणे या गोष्टी वाढल्या. जयप्रकाशजींच्या पुढाकाराने आणीबाणीनंतर स्थापन झालेल्या जनता पक्षाचे विघटन झाल्यावर हिंदुत्वाच्या भूमिकेवर भारतीय जनता पार्टी नव्याने उभी करायच्या प्रयत्नात, पाकिस्तान व भारतीय मुसलमान यांना लक्ष्य बनवून आक्रमक, द्वेष्टे राजकारण करणाऱ्यांचा प्रभाव वाढत गेला. याच काळात संघाने या कामासाठी 'संघपरिवार'नामक आघाडी कुशलतेने संघटित केली. श्री. बाळ ठाकरे यांनी वारे फिरल्याचे हेरून शिवसेनारूपी वाघाच्या डरकाळ्यांचे मुस्लिमांना लक्ष्य केले, न.चिं. केळकर यांना मिळालेल्या 'साहित्यसम्राट' या पदवी-सारखी 'हिंदुहृदयसम्राट' ही पदवी त्यांना प्राप्त झाली, तोही हाच काळ.

दुसऱ्या बाजूला, मुसलमानांच्या मतांसाठीचे राजकारण तेवढे होत राहिले, आणि ते ऐक्य निर्माण करण्यासाठी पुरेसे मानले गेले. त्यांचा राजकारणातील सहभाग, व त्यांच्यापैकी अनेकांच्या उच्चतम पदांवर निवडी वा नेमणुका हे त्याचे प्रभावी गमक मानले गेले. चुचकारणे, पडते घेणे, सवलत देणे म्हणजेच संवाद असे समीकरण घातले गेले. गांधींनी १९४६-४८ या काळात जो संवाद सुरू केला तो बंद पडला, त्याची गरज जवळपास उरलेलीच नाही, असे वर्तन आपले घडत राहिले आहे.

दंगलीनंतर मदतीला, सांत्वनाला धावून जाणे, दंगलीचा निषेध करणे आणि दंगल वेळीच शमेल एवढी ताकद ऐनवेळी




उभी असणे यांत गुणात्मक अंतर आहे. प्रशासन गठित करते त्या शांतता कमिट्यांची टीका-टिप्पणी आपण करीत आलो. पण आपणही दंगलीची धग कमी होईतोवरच काम करतो. तसे तर कोणी काही केले वा केले नाही तरी जनजीवन सुरळीतपणे चालू होतेच.

संवाद म्हणजे परिषदा, परिसंवाद व लेख/पुस्तिका आयोजित/प्रकाशित करणेही नव्हे.

ज्यांच्या मनोधारणा, ज्यांचे वर्तन ऐक्यसंवर्धनाच्या आड येणारे आहे, ज्यांचे विचार वेगळे आहेत, जे विरोधक आहेत त्यांच्याशी सातत्याने चालणारा संवाद येथे अभिप्रेत आहे. गांधींचा खून झाला नसता तर त्यांनी संवादाची ही प्रक्रिया चालविली असती असे दिसते. नोआखालीतले त्यांचे काही सहकारी नंतरची अनेक वर्षे त्यावेळच्या पूर्व पाकिस्तानात असे कार्य करीत होते.

दीर्घकाळ व सातत्याने सत्यक्रियेचे दिव्य करण्याची निकड व तातडी स्पष्ट आहे.

●●





अनुक्रमणिका

## विसावे शतक संपताना

# भारतीय संस्कृतीवर एक दृष्टिक्षेप

यू.आर. अनन्तमूर्ती
(भाषांतर : मीनाक्षी दीक्षित)

---

### प्रास्ताविक

*[बंगलोर येथील विस्तार या संस्थेच्या वतीने प्रख्यात कन्नड कादंबरीकार यू.आर. अनंतमूर्ती यांनी १९९८ साली फादर सेबॅस्टियन काप्पेन यांच्या स्मरणार्थ ३रे स्मृति-व्याख्यान दिले. ते आम्ही येथे मराठीतून अनुवादित करून प्रसिद्ध करीत आहोत.*

*फादर काप्पेन हे रोमन कॅथॉलिक चर्च-अंतर्गत सोसायटी ऑफ जीझसचे (जेझुइट संघ) सभासद होते. कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा गाढ प्रभाव ज्यांच्यावर होता असे ते सश्रद्ध पण बंडखोर (रॅडिकल) ख्रिश्चन विचारवंत होते. तत्त्वज्ञान, मार्क्सवाद आणि ईसाई धर्म व परंपरा यांचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. 'मुक्तिदायी धर्मशास्त्रा'च्या (लिबरेशन थिऑलॉजी) चळवळीतल्या भारतात सक्रिय असलेल्या दाक्षिणात्य तरुण मार्क्सवादी ख्रिश्चन कार्यकर्त्यांचे (ॲक्टिव्हिस्ट्स) १९७५ नंतरच्या काळात ते 'मार्गदर्शक, तत्त्वज्ञ व मित्र' होते. येशू ख्रिस्ताची शिकवण ही सत्ताधारी अभिजनवर्गांनी प्रतिगामी प्रस्थापित हितसंबंधी चौकटीत बंदिस्त करून टाकली; आमूल परिवर्तनासाठी उपकारक असे त्या शिकवणुकीतले मर्म पुन्हा एकवार अभिव्यक्त करणारे लेखन-संभाषण हे फादर काप्पेन यांचे जीवितकार्य होते. पर्यायी मानवीय-आध्यात्मिक संस्कृतीच्या निर्मितीची त्यांना आस होती.*

*विस्तार संस्थेच्या मर्सी काप्पेन यांनी फादर काप्पेन यांच्याविषयी परिचयपर केलेले निवेदन, प्रा. मनु चक्रवर्ती यांनी प्रा. अनन्तमूर्ती यांचा करून दिलेला परिचय, आणि प्रा. अनन्तमूर्ती यांचे भाषण येथे प्रसिद्ध करीत आहोत.*

*— संपादक]*

---

### फादर काप्पेन यांच्याविषयी

**मर्सी काप्पेन**

काप्पेन यांच्या चिंतनाचा एक प्रमुख विषय 'भारतीयांसमोर उभी ठाकलेली सांस्कृतिक आव्हाने' हा होता. सामाजिक परिवर्तनाकडे पाहण्याची त्यांची एक विशेष दृष्टी होती. "वारशाने आलेल्या काचणाऱ्या सांस्कृतिक बंधनांतून मुक्तता मिळवावयाची आणि त्या जागी एका नवीन मानवी आणि माणसातील स्वत्व जागे करणाऱ्या संस्कृतीची स्थापना करावयाची" ही त्यांची दृष्टी होती, "दमनकारी व्यवस्थांविरुद्ध दंड थोपटून जे विद्रोही उभे राहतात, नकार देण्याची हिंमत ज्यांच्या ठायी असते आणि वैकल्पिक संस्कृतीची निर्मिती करण्याची क्षमता ज्यांच्या अंगी असते अशाच व्यक्ती व समूह नवसमाजनिर्मिती करू शकतात" ही त्यांची धारणा होती. काप्पेन यांचा ठाम विश्वास होता की, केवळ असेच लोक नवीन सामाजिक व्यवस्था निर्माण करू शकतील.

"चाकोरी नाकारणारे या अर्थाने विद्रोही वर्तन ही परिवर्तनाची सुरुवात असते आणि परिवर्तनाला चालना देणारेही ते असते," असे काप्पेन यांनी, 'संस्कृती आणि सर्जनशील क्रिया' यांना वाहिलेल्या *निगेशन्स* या ते स्वतः संपादित करीत असलेल्या नियतकालिकात लिहिले होते.





अनुक्रमणिका

"आजच्या संस्कृतीच्या पायाशी सुरुंग लावायचा याची दुसरी बाजू, अर्थात्, एका प्रति-संस्कृतीची निर्मिती करावयाची हीच होय. कारण प्रत्येक नकार हा त्याच वेळी एक होकारही असतो. जेव्हा एखादा शिल्पकार लाकडाच्या ओंडक्यातून चिपा छिलून काढतो तेव्हा तो विध्वंसात्मक काहीतरी करीत असतोच, पण नेमक्या त्याच कृतीने तो नवनिर्मिती म्हणजे एखादी कलाकृतीही बनवीत असतो. हीच गोष्ट संस्कृतीच्या परिवर्तनालाही तंतोतंत लागू पडते."

"विनाश व नवसर्जन यांमध्ये अभेद प्रस्थापित करणारी क्रियात्मकता राजकीय तसेच सांस्कृतिक चळवळीत परिणत होते."

"समाजावर प्रभुत्व गाजविणाऱ्या सत्ताधारी वर्गाचा सांस्कृतिक वरचष्मा नष्ट करून स्वतंत्रपणे व स्वायत्तपणे स्वतः विचार करण्याचा आणि स्वतःची मूल्यश्रेणी निर्माण करण्याचा सामान्य माणसांचा अधिकार त्यांना प्रदान करावयाचा तिचा रोख असतो. आर्थिक आणि राजकीय संस्था यांही काही संकल्पना व मूल्ये यांचा आविष्कार असल्यामुळे अशा विध्वंसक-विधायक कृतींचा परिणाम सर्वच समाजावर होत असतो." काप्पेन सुचवितात की, चिकित्सक टीका व सौंदर्यात्मक निर्मिती हे सांस्कृतिक कृतिशीलतेचे स्वरूप आहे. "सामाजिक नीतीपासून आणि दुही माजवणारी जातिव्यवस्था हिच्यापासून धर्माची फारकत करणे हे आपल्या टीकेचे प्रमुख उद्दिष्ट असले पाहिजे." आपल्या *जीजस ॲन्ड दि कल्चरल रेव्होल्यूशन* या पुस्तकात त्यांनी खेद व्यक्त केला आहे की, ज्या खऱ्या मर्मदृष्टीने जगातील धर्म उदयास आणले तिची प्रतारणा सर्वच धर्मांनी केली आहे आणि मनुष्यजातीला बद्ध करून टाकले आहे.

भविष्याची जडणघडण करण्यासाठी एक द्वंद्वात्मक प्रक्रिया चालवावी लागेल असे काप्पेन यांचे म्हणणे होते. भविष्याची निर्मिती भूतकाळाच्या अतीत जाऊनच होत असते, करता येते. भूतकाळ गाडून टाकणे, त्याच वेळी त्यामध्ये जे जतन करण्यासारखे असेल त्याचे जतन करणे आणि उन्नयन साधणे हे या द्वंद्वात्मक प्रक्रियेचे तीन घटक असतील अशी काप्पेन यांची मांडणी होती. ते कळकळीने सांगतात की, भूतकाळ पूर्णपणे झिडकारून भविष्य घडविता येणार नाही. आणि मिथ्यात्मक पुराण्या सुवर्णयुगाच्या गोड आठवणीने, पुनरुज्जीवनवादाच्या साहाय्याने भविष्य साकारू शकणार नाही. "आपल्या संस्कृतीची उच्च मूल्ये जीमध्ये जतन केली आहेत अशी भविष्यकाळाची एक प्रतिकृती आपण बनविली पाहिजे. कारण ज्याची पाळेमुळे भूतकाळात खोलवर रुजली आहेत असा समाजच खऱ्या सर्जनशीलतेला वाव देऊ शकतो. सर्जक शक्तींना पुन्हाः वाव देण्याच्या दृष्टीने भूतकाळाचा पुन्हा नव्याने अर्थ लावला पाहिजे. नाही तर भारतीय धार्मिक परंपरा ही जनतेकरता अफूची गोळीच ठरेल." ('The Materialistic Conception of History and the Indian Religious Traditions' - *Negations* १९८५ मध्ये काप्पेन यांचा लेख)

परिवर्तनात्मक कृती करता येण्यासाठी वर्तमानाची हाक आपल्याला लक्षपूर्वक ऐकता आली पाहिजे. वर्तमानातच भूतकाळ सामावलेला असतो आणि भविष्याचा गर्भ वर्तमानाच्या पोटातच वाढत असतो. समाजपरिवर्तनाच्या कार्याची पहिली आणि महत्त्वाची पूर्व शर्त म्हणजे समाजस्थितीचे पर्याप्त विश्लेषण ही होय याकडे काप्पेन आपले लक्ष सदैव वेधतात.

जर आपण एका बाजूने मनोधारणा व सामाजिक रचना यांचे द्वंद्व व दुसऱ्या बाजूने अबोध, सुप्त मन व जागृत मन यांचे द्वंद्व लक्षात घेतले नाही तर परिवर्तनाकरता आवश्यक अशी समर्पक व्यूहरचना आपणांला करता येणार नाही असे काप्पेन यांचे मत होते.

आपल्या वैयक्तिक आणि सामूहिक 'अबोध' मनात क्रांतिकारक परिवर्तन घडवून आणणे त्यांना जरूरीचे वाटे. आपल्या सामाजिक संरचनांचे पृथक्करण व विश्लेषण करीत असताना, मानवी सर्जनशीलता व स्वातंत्र्य यांची दखल न घेता, व्यक्तींना केवळ संरचनेचे एकक समजण्याची भूल होऊ न देण्याकडे काप्पेन लक्ष वेधीत.

आजच्या जगाच्या सांस्कृतिक नकाशाचे चित्रण असे करता येईल : "केवळ विक्रेय वस्तूंच्या खरेदी-विक्रीचे माध्यम अशी भाषेची पदावनती, केवळ आर्थिक नफ्याकरता विज्ञानाला वेठीला धरलेले.., मानवसंबंधित शास्त्रांचे सांख्यिकीकरण आणि केवळ संख्याशास्त्रीय गणतीतील एक एकक या दृष्टीनेच व्यक्तीचे स्तोम, बहुराष्ट्रीय व्यापारी-औद्योगिक कंपन्यांच्या सेवेत कला आणि कलाकार यांना रुजू करून घेतलेले, स्त्रियांना भोग्य वस्तूंच्या दर्जावर खाली आणून ठेवलेले, अन्याय्य सामाजिक रचनांना वैधता व प्रामाण्य प्राप्त करून देण्यासाठी धर्माचा उपयोग, व्यक्तिवाद आणि

खाजगी हितसंबंध पोसणारे नीतिनियम, लष्करी ताकद आणि आक्रमण यांचे उदात्तीकरण आणि मानवी गरजांची एकछाप रचना करून त्यांची व्यापारी नफेखोर वृत्तीने हाताळणी. या सर्व प्रक्रियांची सखोल टीका आणि परीक्षण ही एका नव्या संस्कृतीच्या निर्मितीला आणि व्यक्तित्वाच्या नवनिर्मितीला अत्यावश्यक आहे."

काप्पेनचे म्हणणे पुढीलप्रमाणे आहे : "निर्मिती आणि उत्पादन यांमध्ये फरक आहे. उत्पादनातून उपयोगाकरता वस्तू तयार होतात. दुसऱ्या बाजूला, निर्मिती आयुष्याचा सखोल अर्थ मूर्त करते. जीवनार्थाची सदेह आकृती घडविते. हा अर्थ दगड, लाकूड, रंग, आवाज, शारीरिक हालचाल, स्वरातील आरोह-अवरोह अथवा शब्द इत्यादी माध्यमांमधून आकार घेतो. दुसऱ्या शब्दांत हीच गोष्ट सांगावयाची म्हटले तर, स्थापत्य, शिल्पकला, कोरीवकाम, मुद्रण, संगीत, नृत्य आणि साहित्य या गोष्टींतून जीवनार्थ व्यक्त होत असतो. या गोष्टी म्हणजे केवळ दिखाऊपणाचा आणि चैनीचा भाग नसतो; माणूसपणाचा तो मूलभूत आविष्कार असतो. त्यांच्या माध्यमातून मानवी अस्तित्वाची संपन्नता आणि दारिद्र्य, शक्ती आणि वैभव प्रकट होतात. त्यांच्या योगाने मानवसमाजाचे स्वरूप काय आहे हे केवळ समजते असे नव्हे, तर आपल्या ठायी असलेल्या सच्च्या क्षमता वास्तवात मूर्त केल्या पाहिजेत हेही त्यांच्याकडून कळते. अंबोध मनाचा जो अगदी तळचा भाग आहे तेथपर्यंत तो संदेश पोचतो. म्हणूनच त्या गोष्टींत लोकांना उद्युक्त करण्याचे सामर्थ्य असते."

प्रतीकांमध्ये क्रान्ती ही आजच्या काळाची अत्यंत गरजेची गोष्ट आहे हे काप्पेन यांनी म्हटले. प्रतीकांशिवाय माणसांना अर्थपूर्णरीत्या आणि सर्जनशीलरीत्या जगता येणार नाही. पण प्रतीकांच्या जगतात एक पेचप्रसंग उद्भवला आहे. विज्ञानाची आणि तंत्रज्ञानाची एकसारखी होणारी घोडदौड ही एक गोष्ट आणि माणसे ही इतिहासाचा विषय असतात ही दुसरी गोष्ट. या घडामोडींमुळे अलीकडच्या काळात पूर्वापारची यात्वात्मक मिथ्यस्वरूपी धार्मिक प्रतीकांची हकालपट्टी होत चालली असून मानवी जीवन वैराण व शुष्क बनत चालले आहे.

"प्रतीकांचे एक नवीन विश्व, की जे एका नव्या एकमय, पूर्ण, समग्र अस्तित्वाचे दालन खुले करून देईल, त्याची गरज आहे. एक नवीन वैश्विक (कॉस्मिक) एकता पाहिजे. मात्र माणसाच्या निसर्गाधीनत्वावर तिची उभारणी व्हायला नको. त्याला प्राप्त असलेल्या नैसर्गिक गोष्टी आणि त्याने बनवलेल्या गोष्टी, दोन्हींना अर्थ प्रदान करणारा मानव या पायावर ती एकता असेल. थोड्या माणसांनी पुष्कळांच्यावर हुकुमत गाजवून ती निर्माण केलेली नसेल तर स्वतंत्र व्यक्तींनी एकत्र येऊन ती निर्माण केलेली असेल. उद्याची प्रतीके ही नियति अधोरेखित करणारी प्रतीके नसतील तर मानवी स्वातंत्र्याची प्रतीके असतील. ती चाकोरीला बांधून टाकणारी नसतील, तर आत्माविष्काराची प्रतीके असतील. 'आलिया भोगासी असावे सादर' या वृत्तीचा परिपोष करणारी नसतील तर आशा पल्लवीत करणारी असतील. अधिक संपन्न आणि भरीव जीवनासाठी चाललेल्या जनतेच्या झगड्यांतून त्यांची निर्मिती होईल. ज्यांच्यात विद्रोहाचे धैर्य आहे असेच स्त्री आणि पुरुष हे काम करू शकतील. श्रेष्ठींच्या आदेशांपुढे मान तुकवणाऱ्यांकडून अथवा धंदेवाईक क्रान्तिकारकांकडून त्यांची निर्मिती होणार नाही. प्रतीकांचे नवीन जग विद्रोही लेखक, कवी आणि कलावंत निर्माण करतील ज्यांचे भावविश्व सामान्य माणसाच्या भावविश्वाशी सहानुकंपा बाळगणारे असेल आणि ती मंडळी नवनिर्मितीच्या विशुद्ध प्रेरणेशी टोकाची प्रामाणिक असतील." (*Negations* १९८२)

Towards an Alternative Cultural Paradigm हा त्यांचा एक शेवटी शेवटी लिहिलेला लेख आहे. त्यामध्ये विकासाच्या पर्यायी प्रारूपाला पायाभूत आवश्यक असलेल्या सांस्कृतिक बांधणीबद्दल तपशीलवार विचार आहे. त्यात लिहिले आहे : "समाजाच्या केवळ राजकीय संस्थांमधून संस्कृतीचा उगम होता कामा नये, तसेच केवळ काही विवक्षित 'सांस्कृतिक' व्यवहारांची निर्मिती संस्कृतीमधून होऊ नये. दैनंदिन वापराच्या वस्तूंचे उत्पादन, वाटप आणि उपभोग या सर्वांतून संस्कृतीचे प्रकटीकरण व्हावयास हवे. आपल्या आर्थिक जीवनाच्या प्रत्येक बाजूवर तिची निशाणी उमटलेली असली पाहिजे. सांस्कृतिक स्वत्व, आणि ते बदलण्याचा अधिकारही, एक मूलभूत मानवी हक्क म्हणून स्वीकारला गेला पाहिजे. सर्वांना एकाच एकजिनसी संस्कृतीखाली आणावयाचा साम्राज्यवाद प्रसृत होत आहे. त्याला ऐतिहासिक आव्हान दिले पाहिजे. (*Tradition, Modernity, Counter-culture - An Asian Perspective* १९९४)

## यू.आर. अनन्तमूर्ती

**- मनु चक्रवर्ती**

मित्रहो! प्रा. अनन्तमूर्तीसारख्या थोर व्यक्तीची ओळख करून देताना मी, नेहमीच्या रीतीने, 'यांची ओळख करून द्यायची गरज नाही. ती आपल्याला आहेच' असे तोंडदेखले म्हणणार नाही. मला वाटते की, त्यांची खरी ओळख करून देण्याची जरूरी आहे आणि मी माझ्या रीतीने ती करून देऊ पाहतो. सुरुवातीस प्रा. अनन्तमूर्तींच्या साहित्यकृतींचे स्वत्व (being) काय आहे हे पाहू या. वसाहतवादाच्या जोखडातून मुक्त झालेल्या भारतीय समाजापुढे अनेक प्रकारची आव्हाने उभी ठाकत असतात. प्रा. मूर्तींचे सगळ्यात मोठे वैशिष्ट्य माझ्या मताने हे की, त्यांनी 'राजकीयदृष्ट्या बरोबर' या सदरात पडावी अशी भूमिका कधीच मांडली नाही. भारतासारख्या देशात श्रेष्ठ विचारवंतांवर राजकीयदृष्ट्या 'बरोबर' संकल्पना स्वीकारण्याकरता खूप दबाव येत असतात. पण मला आणि माझ्या पिढीच्या इतर लोकांनाही हे पक्के माहीत आहे की, जातिव्यवस्था आणि परंपरा यांसारख्या आणि इतरही कळीच्या प्रश्नांवर प्रा. अनन्तमूर्तींनी राजकारण्यांना नेहमीच आव्हान दिले आहे. या दृष्टीने आम्हा पुष्कळांना ते आजच्या सांस्कृतिक व्यूहात एकाकी पण ठाम उभे आहेत असे वाटत आले आहे. विशेषतः या शतकाच्या सहाव्या ते आठव्या दशकांत कर्नाटकातील सांस्कृतिक चळवळीत प्रा. अनन्तमूर्ती हे तथाकथित पुरोगामी आधुनिकतावादी म्हणविणाऱ्या नेत्यांविरुद्ध एकाकीच उभे राहिले. आज प्रा. अनंतमूर्तींचीच भूमिका योग्य होती असे दिसते. कारण त्या वेळच्या बऱ्याच आधुनिकतावाद्यांनी, गेली तीन दशके प्रा. मूर्ती जिचा पाठपुरावा करीत होते ती भूमिका बरोबर होती असे आता मान्य केले आहे. एक उदाहरण देतो. श्री. लंकेश हे अनन्तमूर्तींचे टीकाकार. जातिव्यवस्था, धर्म अशा महत्त्वाच्या मुद्यांवर बौद्धिक पातळीवर अनन्तमूर्तींना आव्हान देणारे. पण आज त्यांच्या *उल्लंघने* या पुस्तकात, प्रा. अनन्तमूर्तींनी दीर्घकाळ स्वीकारलेल्या भूमिकेचे महत्त्व त्यांनी मान्य केलेले दिसते.

अनंतमूर्तींच्या सर्जनशीलतेचा एक महत्त्वाचा विशेष परस्परविरोधी गोष्टी एकमेकांच्या सान्निध्यात उभ्या करण्याचे त्यांचे तंत्र. एका बाजूला आपले सामाजिक तणाव कमी करण्याच्या दृष्टीने बुद्धिवादाची कास धरणे हा एक चांगला पर्याय असल्याचे ते सुचवितात तर त्याचबरोबर नारायणगुरू, श्रीरामकृष्ण परमहंस, रमणमहर्षी, अक्क, बसव, अल्लमा या थोर पुरुषांच्या गूढ आध्यात्मिक परंपरेकडेही ते तेवढाच समर्थ पर्याय म्हणून आपले लक्ष वेधतात. टोकाच्या दोन भिन्न गोष्टी परस्परांच्या निकट सान्निध्यात जेव्हा आपण आत्मसात करतो तेव्हा अनेकांना अतिशय पुरोगामी वाटणाऱ्या आत्यंतिक टोकाच्या भूमिका आपण घेत नाही. माझ्या मते 'हे' किंवा 'ते' अशा परस्परव्यावर्तक विरोधाच्या चौकटीबाहेर पडण्यासाठीचा प्रयत्न हा आपली परंपरा समजावून घ्यायला फार उपयोगी आहे. त्या दृष्टीने उपखंडातील वासाहतिकोत्तर कालातील श्रेष्ठ लेखकांत त्यांचे स्थान फार वरचे वाटते. Progression through contraries या इंग्लिश कवी विल्यम ब्लेक यांच्या क्रांतदर्शी दृष्टीला त्यांनी जिवंत केले आहे. त्यामुळे एका पातळीवर निर्बुद्ध सनातनी भूमिकांचे खंडन करायला आपण बुद्धिनिष्ठ तर्काचा वापर करतो तर दुसऱ्या पातळीवर अतिशय तर्ककर्कश बुद्धिवादाच्या खोड्यात अडकण्याच्या संकटातून सोडवणूक करून घेण्यासाठी आपण भेदविलोपनी साक्षात्कारी परंपरांकडे वळतो. Progression through contraries हे अनन्तमूर्तींकडून आम्ही पुष्कळजण शिकलो. हा मुद्दा स्पष्ट करण्याकरता त्यांच्या दोन विशेष महत्त्वाच्या कथांकडे निर्देश करतो. एक आहे, Suryankudra (सूर्याचा घोडा) आणि दुसरी अगदी अलीकडची Bete Bale Mathu Othiketha (शिकार, कंकण आणि सरडा). या कथा नीट वाचल्या तर ध्यानात येते की, त्यांत केवळ पाश्चात्त्य सौंदर्यशास्त्रीय संकल्पनांना आव्हान आहे एवढेच नव्हे, तर जाणीव, चेतना यांसंबंधीच्या अनेक कल्पनांनाही त्यात आव्हान आहे. या ऐतिहासिक कालखंडात वावरत असलेल्या आमच्यासारख्या अनेकांसाठी हा फार महत्वाचा बोध आहे. त्या दृष्टीने प्रा. अनन्तमूर्ती यांचे सगळ्यात महत्त्वाचे वैशिष्ट्य हे की त्यांच्या लिखाणात प्रत्यक्ष जहाल राजकारण येत नसले तरी त्यांच्या लिखाणात कमालीचे बंडखोर, मुळाशी जाऊन पोचणारे सांस्कृतिक राजकारणच आहे.

पुष्कळांना प्रा. मूर्तींमध्ये विचारांचे द्वैत आहे असे वाटते. पण मला ते द्वैत नसून त्यांच्या ठायी सरळ सरळ दुविधा आढळते. परंपरावाद्यांना ते परंपराविरोधी वाटतात तर पुरोगामी


अनुक्रमणिका

त्यांना पुनरुज्जीवनवादी समजतात. आणि नक्कीच ते या दोन्हींपैकी काहीच नाहीत. माझे वैयक्तिक मत असे की, भूमिकेमधील दुविधा मोकळेपणी राखण्यासाठी आजच्या परिस्थितीत माणसाकडे फार मोठे धैर्य हवे. आजच्या भारतीय समाजस्थितीत टोकाच्या जहाल भूमिका घेणे तसे सोपे आहे. पण जेथे हे किंवा ते असा तुकडा पाडता येत नाही, दोन्हींत सत्यांश असतो, तेथे ही दुविधा कायम राखणे, तिला उचलून धरणे आणि तिची पुष्टी करणे ही गोष्ट, सांस्कृतिक क्षेत्रातील तुमच्या समाजातील एक प्रवक्ता/नेता म्हणून तुमच्या प्रत्येक उक्ती-कृतीत साधणे यासाठी फार मोठी हिंमत लागते.

या ओळख करून देण्यातील आणखी एक महत्त्वाचा पैलू माझ्या, त्यांचा शिष्य म्हणून घालवलेल्या आयुष्याविषयी आहे. १९७५ पासून मी १९८४ साली बंगलोरला गेलो तोपर्यंतची दहा वर्षे त्यांच्या पायाशी बसून मी सर्व तऱ्हेच्या संकल्पना आत्मसात केल्या. भारतीय लेखकांइतकाच शेक्सपियर, टॉलस्टॉय, दोस्तोयेवस्की आणि इतर थोर जर्मन व फ्रेंच लेखकांना मी साक्षात्कारी, प्रत्ययकारी स्वरूपात भिडू शकलो. मी विद्यार्थी असताना एकदा ते जे एक वाक्य बोलले ते माझ्या मनावर कायम ठसले आहे आणि अध्यापक म्हणून वावरताना ते मला कायम प्रेरणादायी ठरले आहे. ते वाक्य असे : कोणालाही विशेषतः कोणाही, विद्यार्थ्याला, त्याला मार्क किती मिळतात यावरून जोखू नकोस. त्या विद्यार्थ्यात ज्ञानसंपादनाची कुवत किती आहे हे पाहा. कोणतीही कृती त्या क्षणापुरेशी असते. ती तेथेच संपते. तुमच्या अंतःकरणातील क्रियाशीलता मात्र वृद्धिंगत होत असते. हा कळकळीचा उपदेश आम्हा कित्येकांना शिक्षक म्हणून आणि जास्ती करून माणूस म्हणून दिशा दाखवत आला आहे. तो करुणा आणि जीवनविषयक खोल समज यांनी ओतप्रोत आहे.

●●

---

### विसावे शतक संपताना

## भारतीय संस्कृतीवर एक दृष्टिक्षेप

**यू.आर. अनन्तमूर्ती**

प्रा. मनू चक्रवर्ती आता माझ्याविषयी जे परिचयपर बोलले, ते ऐकून मला खरोखरीच बरे वाटले. आपला वाचकांशी संवाद साधला जातो आहे ही कुठल्याही लेखकाला अतिशय समाधानाची गोष्ट वाटते. ही प्रतीती माझ्या एका फार हुशार विद्यार्थ्याकडून मिळाली म्हणून मी त्याचा कृतज्ञ आहे.

कोट्टायममध्ये मी प्रथम फादर काप्पेन यांना भेटलो. (याच नावाने मी त्यांना ओळखतो.) प्रा. दयाकृष्ण हे एक थोर विचारवंत आणि तत्त्वज्ञ आहेत. त्यांनी मला एकदा सांगितले की, केंब्रिजमधील एका ग्रीक तत्त्ववेत्त्याला बोलावून त्याची इथे केरळमधील काही चांगल्या बुद्धिवंतांशी गाठभेट घडवून आणावीस. फादर काप्पेन यांचे काही लिखाण मी वाचले होते. म्हणून त्यांनाही या प्रसंगी मी आमंत्रित केले. त्या वेळी त्यांची प्रकृती तितकीशी ठीक नव्हती. पण त्यांच्या तेजस्वी बुद्धिमत्तेमुळेच केवळ नव्हे तर अंतरात्म्यामधून जी ऊर्मी प्रकट होत होती त्याने मी खूपच प्रभावित झालो. मला ते एखाद्या ऋषीप्रमाणे भासले. आपल्याला खरोखर काय म्हणायचे आहे ते कोणाचा पाठिंबा नसला तरी ठामपणे मांडण्याचे धाडस त्यांच्यात होते. आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करून कोणावर त्यांना छाप पाडायची नव्हती. मला त्यांचा हा सर्वांत आकर्षक विशेष वाटला. त्यांचे *Tradition, Modernity, Counterculture - An Asian Perspective* हे पुस्तक मला दिल्याबद्दल मी जॉन यांचा फार ऋणी आहे. फार महत्त्वाचे पुस्तक विस्तार संस्थेने प्रकाशित केले आहे. मी आज जे काय म्हणू इच्छितो ते एका रीतीने या पुस्तकातील आशयाशी संबंधितच आहे. तसेच मर्सी काप्पेन यांनी आता जे प्रास्ताविक भाषणात म्हटले त्याच्याशीही त्याचा संबंध आहे.

आपल्याच संस्कृतिसंबंधात आपली जी द्विधा मनःस्थिती होत असते त्याविषयी मी आता थोडे बोलणार आहे. होते काय की — माझी खात्री आहे, माझ्यासारखीच इतर पुष्कळांची









अनुक्रमणिका

स्थिती होत असणार — जेव्हा आपल्यापैकी एखाद्या फार सनातनी, रूढिप्रिय स्त्रीशी अथवा पुरुषाशी मी काही चर्चा करतो तेव्हा माझ्या असे लक्षात येते की, आपण त्या व्यक्तीच्या विरुद्ध पक्ष घेतो आहोत. आपल्या परंपरागत कल्पनांच्या फार विरोधी, सनातनी विचारांच्या फार विरोधी असा त्या वेळी माझा पक्ष असतो. मी काय भलताच पुरोगामी, आधुनिकतावादी झालो आहे की काय असे माझे मलाच वाटू लागते. अर्थात, काही एका मर्यादेपर्यंत मी आधुनिकतावादी झालोच आहे. पण, एखाद्या युरोपकेंद्री पुरोगामी प्रतिपक्षीयाशी गाठ पडली तर असे लक्षात येते की, त्यावेळी ज्यावर मी खूप टीका केली होती ती परंपरानिष्ठ, सनातनी भूमिका मी माझी भूमिका म्हणून मांडू लागलो आहे.

पुनरुज्जीवनवादी आणि आधुनिकतावादी अशा दोन पक्षांत आपल्या जगाची विभागणी झाली आहे असे दिसते. आपल्या संस्कृतीतील अन्याय, विषमता आणि अंधश्रद्धा यांबाबत पुनरुज्जीवनवादी संवेदनाशून्य असतात. त्यामुळे त्यांच्यावर हल्ला चढविताना तुम्ही आपोआपच युरोपियन विवेकवादाची (रॅशनॅलिझम) बाजू लढवत असता असे वाटते. पण युरोपीय विवेकवादी सुद्धा काही मोठ्या मुद्यांच्या बाबतीत आणि ज्ञान मिळविण्याच्या आणि अस्तित्वाच्या (being) अन्य रीतींच्या बाबतीत तितकेच संवेदनाशून्य असतात. थोडक्यात, आपल्यासमोरील पेचाचे स्वरूप या तऱ्हेचे आहे. अशा दुभंगलेल्या संस्कृतीत आपण राहात असल्यामुळे आपल्या स्वतःच्या जीवनदर्शनाशी प्रामाणिक राहणे या स्थितीत तसे बरेच अवघड पडते.

गेल्या शतकाच्या पाचव्या आणि सहाव्या दशकात — म्हणजे माझ्या वाढीच्या वयात — माझ्यापुढे एक निराळाच मोठा प्रश्न उभा ठाकला होता. राजकारण, साहित्य, संस्कृती कशासंबंधीही तुम्ही चर्चा करा, त्या वेळी एकतर तुम्ही अमेरिकाधार्जिणे म्हणून किंवा रशियाधार्जिणे म्हणून तुमच्यावर शिक्का बसत असे. माझ्या अनेक मित्रांच्या बाबतीतही हेच झाले. एक उदाहरण द्यायचे तर अ.भि. शहा यांचे देता येईल. शिवाय, केव्हा केव्हा कार्यकर्त्यांना न कळूनही सी.आय.ए. (अमेरिकी) किंवा के.जी.बी. (रशियन) या गुप्तहेर संघटनांकडून पैसा व पाठिंबा यांचे ते धनी होत. स्टीफन स्पेन्डरचेच प्रसिद्ध प्रकरण घ्या. इतके वर्षे ते *एन्काऊंटर* मासिकाचे संपादन करीत होते. त्यासाठी लागणारा पैसा सी.आय.ए. पुरवीत असे हे त्यांना माहीतच नव्हते. हे आपल्याला खूपच उशिरा समजले असे त्यांनीच मागाहून कबूल केले. वस्तुतः, पूर्व युरोपीय राष्ट्रांतील लेखक आणि त्यांचे स्वातंत्र्य यासाठी ते झुंजत होते. त्यांचे कार्यही चांगले होते. ते कार्य सी.आय.ए. च्या पैशावर चालले हीही एक गंमतच. पण आता दुसरीही बाजू बघू. याच रीतीने कम्युनिस्ट चीन व सोविएत युनियनही खूपच व्यक्तींना व संघटनांना पैसे पुरवीत होते. शिवाय, अनेक भारतीय साहित्यिक — खरोखरचे प्रतिभाशाली साहित्यिक — सोविएत युनियनमध्ये गेले, अनेक वर्षे तेथे राहिले, तेथील जुलुमजबरदस्ती, क्रौर्य आणि भीती स्वतःच्या डोळ्यांनी त्यांनी पाहिली. पण त्याविरुद्ध अवाक्षर त्यांनी उच्चारले नाही. (की त्यांचे धाडस झाले नाही?). असे का? तर साम्यवादाचे तत्त्वज्ञान आणि सामाजिक न्यायाचे तत्त्व आपण मानले पाहिजे असे त्यांना वाटले. त्यांचा विश्वास होता की, जरी सोविएत युनियनमध्ये कम्युनिस्ट सत्ताधाऱ्यांच्या आचारात अनेक त्रुटी असल्या, अनेकांवर अन्याय झाला असला, तरी परिस्थिती सुधारली की त्या चुका दुरुस्त केल्या जातील. साम्यवादी आदर्श व्यवहारात उतरविले जातील आणि म्हणून आज त्यांचे अपराध आपण त्यांना माफ केले पाहिजेत. त्या चुका उघड्या पाडून आपण साम्यवादाच्या शत्रूंच्या हातचे बाहुले होता कामा नये. त्याचप्रमाणे, अमेरिकेने व्हिएटनाममध्ये जे अत्याचार केले त्याविषयीही अगदी मुग्धता बाळगली जाई. ज्याच्याविषयी मला फार आदर आहे असा माझा एक अगदी जवळचा मित्र तर म्हणालाच की, व्हिएटनामशी युद्ध करणे बरोबरच होते. काहीही करून लोकशाहीविरोधी शक्ती खच्ची करायलाच हव्या होत्या. इथे भारतात जर स्वतःला बुद्धिवन्त आणि सुसंस्कृत म्हणविणाऱ्या आपल्यासारख्यांना अशा भूमिका घ्याव्या लागतात तर, थोडे थांबून, हे असे वागणे का होते त्याचा जरा नीट विचार केला पाहिजे असे मला वाटते.

आता आपण आजच्या भारताबद्दल विचार करू लागलो तर असे लक्षात येते की, युरोपीय लोकांच्या २० व्या शतकात आपण जाणीवपूर्वक राहात आहोत. मागील शतकाच्या आरंभी युरोपियांच्या १९व्या शतकात आपण जगतो आहोत याची बहुसंख्य भारतीयांना जाणीवच नव्हती. परंतु युरोपमधील फ्रान्स, जर्मनी, इटली वगैरे सर्वच देशांतील लोकांना पूर्ण माहीत होते की, आपण १९ व्या शतकात राहात आहोत.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस काळासंबंधी आमच्या भारतीयांच्या स्वतःच्या वेगळ्या कल्पना होत्या. त्यामुळे युरोपमध्ये ज्या मुद्यांवर संघर्ष चालू होता त्यामध्ये कोणा एकाचा पक्ष घेण्यावरून आपणात तट पडले नव्हते. परन्तु आता मात्र इतरत्र चाललेल्या झगड्यात आपण जी बाजू घेऊ तीवरून आपले सांस्कृतिक मूल्यमापन होते, केवळ भारतातील समस्यांच्या वरून जे वाद माजलेले आहेत त्यांमध्ये आपण कोणाच्या बाजूचे आहोत त्यावरून नाही. अशा या शतकात आपण राहात आहोत आणि जवळजवळ त्याच्या टोकाशी आलो आहोत.

'परंपरा' आणि 'आधुनिकता' यांसंबंधी काप्पेननी काय लिहिले ते मी वाचीत होतो. या विषयावर लिहिताना काप्पेन फार संवेदनाशीलता प्रकट करतात. ते दाखवून देतात की, परंपरानिष्ठ व आधुनिक दोन्ही टोकाच्या भूमिका या मोठ्या प्रमाणावर संवेदनाहीनता उत्पन्न करतात. आजची सगळ्यात धोक्याची प्रवृत्ती अशी की, आपले राजकारणी करतात तसे, आपण एका अंगाने आधुनिक वागतो परंतु सत्तासंपादनासाठी व राबविण्यासाठी पारंपरिक युक्त्याप्रयुक्त्यांचा वापर करतो. आमच्या राजकारण्यांना पूर्णपणे माहीत आहे की, आपण आधुनिक काळात वावरतो आहोत. पण तरीही जात, धर्म आणि इतर पारंपरिक अवधारणांचा ते उपयोग करून घेत असतात. त्यांच्या विचारांचा देखावा सगळा आधुनिक विवेकवादी, युरोपियन ढाच्याचा असतो. पण सत्तासूत्रे मात्र समता, न्याय या मूल्यांनुसार हलविली जात नाहीत, तर ती पूर्ण पारंपरिक धारणांनुसार हलतात. उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश, कर्नाटक, तामिळनाडू इत्यादी जवळजवळ प्रत्येकच राज्यातील राजकारण्यांबाबत हे खरे आहे.

आश्चर्य असे की केरळसुद्धा यातून बचावलेले नाही. खरे तर केरळमध्ये सामाजिक न्यायाकरता बरेच लढे यशस्वीरीत्या लढविले गेले आहेत. वर्गावर आधारित राजकारण करीत असलेल्या केरळ राज्यावर आज जातीय राजकारणाची भक्कम पकड बसली आहे. एक नायर पार्टी, दुसरी ख्रिश्चन पार्टी तर आणखी एक इझ्यावा (Ezhava) पार्टी. याउलट, कर्नाटकात देवराज अर्स जातीजातींचे राजकारण खेळत होते पण त्याचे वर्गीय राजकारणात रूपांतर झाले आहे. म्हणजे, जे जातीय राजकारण दिसत होते ते वर्गीय झाले आणि, याच्या उलट, वर्गीय म्हणता म्हणता ते जातिवादीच ठरले. याचा अर्थ काय? परंपरा आणि आधुनिकता यांसंबंधी योग्य वृत्ती कोणती? हे सर्वच गोंधळाचे आहे. चालू शतकाकडेच एक नजर टाकू. शतकाच्या ५व्या व ६व्या दशकात एक पक्का तात्त्विक पाया धरून घट्टपणे उभे राहणे शक्य होते. पण शतक संपत येताना तसे करणे शक्य दिसत नाही. 'आणीबाणी'ने एक गंभीर समस्या आपल्यापुढे उभी केली. असे वाटले की, गांधीवादात 'आणीबाणी'ला उत्तर सापडेल. पण इंदिराजी जेव्हा प्रचंड सत्ता आपल्या हाती एकवटत होत्या तेव्हा आपण काय भूमिका घ्यावी यासंबंधी गांधीवाद्यांमध्ये स्पष्टता नव्हती. गांधींचे एक शिष्य जयप्रकाश नारायण 'आणीबाणी'च्या विरोधात होते तर दुसरे शिष्योत्तम विनोबाजी यांचा इंदिराबाईंना पाठिंबा होता. बरोबर दृष्टिकोन कोणता यासंबंधी गांधीवाद ठाम उत्तर देऊ शकत नव्हता. विनोबाजींनी मागाहून आपला पाठिंबा मागे घेतला तरी सुरुवातीस तरी 'अनुशासनपर्व' असे म्हणून ते इंदिराजींचा पाठपुरावा करीत होते. विनोबांनी दिलेला पाठिंबा इंदिराजींनी खुशीने घेतला पण आणीबाणी संपवावी असे विनोबांना वाटले तेव्हा मात्र त्या त्यांचा सल्ला ऐकण्याच्या मनःस्थितीत नव्हत्या. अशा रीतीने, गांधीवाद्यांतच जेव्हा स्पष्ट भूमिका नव्हती आणि आम्हांला गांधीवादातून सुस्पष्ट मार्गदर्शन मिळू शकत नव्हते, तेव्हा जयप्रकाश आणि विनोबा यांच्या इतक्या परस्परविरोधी भूमिका पाहून आपण आता काय भूमिका घ्यावी हे कळेच ना.

मार्क्सवाद्यांचेही असेच झाले होते. त्यांच्यातील एक गट 'आणीबाणी'ला पाठिंबा देत होता, तर दुसरा निषेध करीत होता. अशा परिस्थितीत योग्य भूमिका कोणती याचे मार्गदर्शन तत्त्वज्ञान म्हणून मार्क्सवादातूनही मिळू शकत नव्हते. खरे म्हणजे, विसाव्या शतकातील कोणतीच तत्त्वप्रणाली आध्यात्मिक दृष्ट्या आणि नैतिक दृष्ट्या युक्त काय, अयुक्त काय हे स्पष्ट सांगू शकण्याची क्षमता राखत नाही. त्यासंबंधीची ठाम भूमिका आपल्या अंतःकरणातूनच उमटली पाहिजे. नुसता तर्कनिष्ठ व सुसंगत विवेकवादी युक्तिवाद आणि संकल्पना व तिचे विश्लेषण हे पुरेसे नसते. पण आपण ते पुरेसे मानले. मार्क्सवाद्यांना वाटत होते की, मार्क्सवाद हा शास्त्रीय पायावर उभा आहे तेव्हा तो चुकू शकणारच नाही. पण तो बाद ठरलाच. आता, हे का आणि कशामुळे घडले?

अनुक्रमणिका

मला वाटते, जेव्हा बुद्धिवादी भूमिकेत असताना सखोल आध्यात्मिक आस्था आपण प्रकट करीत नाही आणि जेव्हा आध्यात्मिक भूमिका अंगिकारतो तेव्हा सखोल राजकीय व आर्थिक घटक विचारात घेत नाही. त्यामुळे, आपल्याला जाणवणाऱ्या समस्यांसंबंधी परंपरानिष्ठ आणि आधुनिक असे दोन्ही युक्तिवाद मुळातच चुकीचे ठरतात; कारण त्यात प्रश्नांचा सामग्र्याने, एकात्म विचार केलेला नसतो. या संदर्भात गांधीजींचे विचार महत्त्वाचे ठरतात. विसाव्या शतकातील प्रश्न सोडविण्यास उपयोगी ठरू शकेल असा काही पर्याय ते शोधू पाहात होते. *हिंद स्वराज्य* या त्यांच्या बीजभूत पुस्तकात त्यांनी हा पर्यायी दृष्टिकोन विशद केला आहे. नेहरूंनी हे पुस्तक वाचावे अशी गांधींची इच्छा होती. नेहरूंनी ते वाचले की नाही हे मला ठाऊक नाही. भारताला स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी गांधींनी पंडितजींना एक पत्र लिहिले होते. त्या पत्राची सुरुवातच अशी : "तुम्ही माझे हे पुस्तक वाचलेत का? मला शंका आहे... तुम्हांला पत्र हिंदुस्तानीत लिहू का इंग्लिशमध्ये?" मूळ पत्र हिंदुस्तानीत लिहिलेले आहे की इंग्रजीत हे मला माहीत नाही, कारण मी ते इंग्रजीतून वाचलेले आहे. त्यात ते पुढे म्हणतात की, दुर्दैवाने, तुम्ही (नेहरूंनी) *हिंद स्वराज्य*-मधील युक्तिवाद गांभीर्याने लक्षात घेतलेला नाही. आपल्याला दिसते की *हिंद स्वराज्य*मध्ये गांधीजी, आपण ज्याला आधुनिक समाजव्यवस्था/संस्कृती म्हणतो तिच्याविषयी टोकाला जाऊन विकासाच्या आधुनिक संकल्पनेचे खंडन करतात. त्यांच्या मते ही आधुनिक संस्कृती आजारी आहे; नव्हे, ती संस्कृती हाच एक आजार आहे, आणि त्यापासून आपण मुक्त व्हावयास हवे. गांधींचे म्हणणे असे की, ब्रिटिश इथे राहू का शकतात, तर आपल्याला आधुनिक संस्कृतीचे वेड आहे म्हणून. ते याबद्दल आपल्याला दोष देतात, ब्रिटिशांना नव्हे. ही आधुनिक संस्कृती केवळ आपल्यालाच त्रासदायक आहे असे नव्हे तर ब्रिटिशांनाही ती दुःखदायकच आहे. म्हणून स्वातंत्र्याचा लढा हा भारताच्या स्वातंत्र्याकरिताच केवळ आहे असे नसून इंग्रजांच्याही सुटकेकरता आहे. ज्यांनी युरोपियन संस्कृतीच्या मुशीत तयार झालेला कणखर, बलिष्ठ भारत आपल्या नजरेसमोर ठेवला होता अशा बंकिमचन्द्रांसारख्या लेखकांच्या, लोकमान्यांसारख्या पुढाऱ्यांच्या संपूर्ण विरोधात असलेली अशी ही भूमिका आहे. बंकिमचन्द्रांचे एक पुस्तक आहे श्रीकृष्णासंबंधी. फार महत्त्वाचे आहे. ते म्हणतात की, आज आपल्याला त्या साक्षात्कारी, आध्यात्मिक साधक कृष्णाची गरज नाही. गरज आहे ती महाभारतातील चतुर राजकारणी श्रीकृष्णाची. ती भागली तर भारत बलाढ्य बनेल व ब्रिटिशांची येथून हकालपट्टी करू शकेल. एका दृष्टीने पाहता, भारतीयांनी इंग्रजांचे काही गुण आत्मसात करावे म्हणजे त्यांच्याच पातळीवर त्यांचा मुकाबला करून त्यांना हाकलून काढता येईल अशी त्यांची योजना होती. गांधीजींची भूमिका याहून भिन्न होती. भारतात एक नवीनच तंत्रविद्या उत्पन्न होते आहे असे वाटत होते आणि गांधीजी तिच्या उदयाकरता अगदी तांत्रिक असल्यासारखे प्रयत्नात होते. तांत्रिक कोण? तर, आपल्या मनातील कल्पना, आकांक्षा काही विशेष युक्ती वापरून प्रत्यक्षात आणू पाहतात ते. त्या दृष्टीने गांधीजी एक महान तांत्रिक होते. भारतीय सांस्कृतिक कृतिशीलतेला एक नवेच वळण लावण्याचा प्रयत्न त्यांच्या बोलण्यात व कृतीमध्ये असे.

राष्ट्र या संकल्पनेविषयी गांधी काहीसे साशंक होते. कारण हिटलर, मुसोलिनी यांच्यासारखे नेतेसुद्धा राष्ट्र, राष्ट्रवाद यांच्या गोष्टी करीत होते व त्यांचा प्रचार करीत होते. त्यांच्या तऱ्हेचा राष्ट्रवाद गांधीजी आणि टागोर दोघांच्याही दृष्टीने त्याज्य होता. टागोरांना तर जास्तच. आधुनिक अर्थाच्या राष्ट्र संकल्पनेचे टागोर अधिक जहाल टीकाकार होते. गांधी अधिक व्यवहारी होते. ब्रिटिश सत्तेविरुद्ध झगडा करण्याकरता योग्य अशी लढ्याची रीत तर त्यांना शोधली पाहिजे होती, आणि सामान्य माणसांना या लढाईकरता उद्युक्त करण्यासाठी राष्ट्र ही संकल्पना उपयुक्त ठरू शकत होती. परंतु गांधीजींचा अग्रक्रम, एकंदरीत पाहता, अधिक सामाजिक स्वरूपाच्या गोष्टी साध्य करण्याकडे होता. त्यांनी पुष्कळदा म्हटले आहे की, त्यांच्या तीन महत्त्वाकांक्षा आहेत. पहिली म्हणजे अस्पृश्यतेची रूढी नष्ट करणे, दुसरी म्हणजे हिंदू व मुसलमान यांच्यात ऐक्य घडवून आणणे व तिसरी म्हणजे चरख्याचा, खादीचा प्रसार करणे. नीट बघितले तर लक्षात येईल की हा माणूस बलवान राष्ट्र उभे करण्यापेक्षा स्वायत्त नागरी समाजाच्या निर्मितीसाठी झटत होता. वास्तविक विसाव्या शतकाची सर्वात गहन समस्या ही अलगतावादी, व्यावर्तक कट्टर राष्ट्रवादाचीच आहे. ब्रिटिश भारतात सत्ताधीश म्हणून का राहू शकले? हिंदू व मुस्लिम यांच्यात बेबनाव होता हे एक कारण. हे दोघे एकत्र नांदू शकत नाहीत म्हणून आम्ही

येथे पोलिसांची भूमिका बजावत आहोत असे समर्थन असे. जर हिंदू-मुस्लिम ऐक्य साध्य झाले तर ब्रिटिशांच्या पोलिसगिरीला काही समर्थन उरणार नव्हते. दुसरे म्हणजे अस्पृश्यता. हिंदू संस्कृतीला गाभ्यातच लागलेली ही कीड आहे. सवर्ण हिंदूंनीच तिच्यावर कठोर टीका करून ती आतूनच बदलण्याचा प्रयत्न केला नाही तर हिंदुत्व हा जीवनमार्ग म्हणून स्वीकारणे कायमच चुकीचे व अवघड ठरेल. म्हणून अस्पृश्यता नष्ट करण्याची निकड. आणि शेवटी खादी. खादीच्या पुरस्कारातून गांधीजींना असे सुचवायचे होते की, जो आधुनिक पद्धतीचा विकास युरोपमध्ये झालेला दिसतो तशा तऱ्हेचा विकास आम्हांला नको आहे. त्या विकासासंबंधी आम्हांला जो मोह वाटतो, तोच इंग्रजांची राज्यसत्ता येथे टिकण्यास कारणीभूत आहे. म्हणून पाश्चात्त्यांच्या धर्तीच्या विकासाच्या आकर्षणापासून आपण स्वतःला मुक्त केले पाहिजे. ते म्हणत की, 'यंत्रांकरवी मोठ्या प्रमाणावरचे उत्पादन नको. जनसामान्याच्या हातांना काम देणारे उत्पादन हवे. 'not mass production, but production by the masses' हे एक अर्थशास्त्रीय तत्त्वच त्यांनी सांगितले. पण हे लक्षात घ्यायला हवे की, ब्रिटिशांकडून आपल्या हाती सत्ता यावी अशी आपली एक महत्त्वाकांक्षा आहे असे या सबंध प्रतिपादनात एकदाही ते म्हणत नाहीत. त्या काळातील कुठलाही राजकीय कार्यकर्ता हा सत्तेच्या हस्तांतरासंबंधीच बोलेल अशी अपेक्षा कोणीही करेल. पण गांधीजी म्हणाले की, वर सांगितलेल्या तीन गोष्टीच साध्य करण्याची आपली महत्त्वाकांक्षा आहे, सत्ताप्राप्ती नव्हे. सत्तांतर काय, या तीन गोष्टी साध्य झाल्या की आपोआपच होईल. अगदी तळागाळातील थरापासून खरोखरीची लोकशाही कशी निर्माण होऊ शकते याचा एक वस्तुपाठच राजकीय कार्यकर्ते, मुत्सद्दी आणि साहित्यिक यांना तेव्हा मिळाला. याशिवाय आणखी काही शक्ती कार्य करीत होत्याच आणि अशा परिस्थितीत गांधीजींना, बलाढ्य आधुनिक राष्ट्राची म्हणण्यापेक्षा, सुसंस्कृत म्हणता येईल अशा स्वायत्त नागरिक समाजाची निर्मिती करण्याचा प्रयत्न सतत चालू ठेवावा लागला.

आणखी एक उदाहरण घेऊ. आपल्या या शतकाची सुरुवातच मुळी एक महत्त्वाचे चर्चाविश्व जन्माला घालून झाली. राष्ट्र की समाज असा तो वाद होता. भारतातील जवळजवळ सगळेच बुद्धिवन्त या वादात गुंतले होते. डॉ. आंबेडकरांसारखा थोर विचारवंत आणि इतरही काही असे प्रतिपादन करीत होते की, भारतीय समाजव्यवस्था अतोनात अन्याय्य आहे. जातिव्यवस्था हे त्या अन्यायाचे एक ज्वलन्त उदाहरण होय. त्यामुळे अस्पृश्यांनी खेडेगावात राहणे म्हणजे नरकयातनाच भोगण्यासारखे आहे. म्हणून आंबेडकरांचे म्हणणे होते की, अस्पृश्यांना खेड्यांतून बाहेर पडता येण्याकरता, ब्रिटिशांच्याकडून सत्तांतर होण्यापूर्वी सर्वप्रथम समाजक्रान्ती होणे आवश्यक आहे. एरवी, होणारे सत्तांतर हे ब्रिटिशांकडून वरिष्ठवर्णीयांना मिळणारी सत्ता या स्वरूपाचे असेल; सामान्य जनता मात्र शोषण व जुलुमजबरदस्ती यात तशीच पिचत राहील. याउलट टिळकांना पारंतत्र्यातून मुक्तता मिळवणे हीच पहिली प्राप्य गोष्ट वाटत होती. एक बलिष्ठ राष्ट्र तयार होणे ही त्यांना सर्वांत महत्त्वाची गोष्ट वाटत होती. त्यांच्या मते एकदा आम्ही स्वतंत्र झालो, मुक्त झालो म्हणजे सामाजिक क्रांतीला चालना मिळेल व ती सहजच घडून येईल. अशा रीतीने हा वाद चालू होता. अर्थात हा दुपदरी विरोध समजण्याच्या दृष्टीने मी ही चर्चा जरा सोपी करून सांगतो आहे.

आपण परंपरा आणि आधुनिकता यांमधील संघर्षापासून सुरुवात केली. या विवादाने शतकभर आपला पिच्छा पुरविला. या वादात गांधीजींनी जी भूमिका घेतली ती अगदीच वेगळी होती. त्यांनी इंग्रजांना भारत सोडून जायला सांगितले. त्यांनी भारत हे एक राष्ट्र आहे ही भूमिका मानली होती; पण एक निराळ्या प्रकारचे राष्ट्र त्यांना अभिप्रेत होते — ज्यात विकेंद्रीकरणाच्या ढाच्यातून आम जनतेने (खेड्यापाड्यांतून) सर्वत्र केलेले उत्पादन होईल, केवळ मोठ्या प्रमाणावरचे यंत्राधारित केंद्रीभूत उत्पादन नव्हे, अशी ती भूमिका होती. तसेच, ब्रिटिशांविरुद्ध राष्ट्रीय स्तरावर लढा शिगेला पोचला असताना, तो मध्येच मागे घेऊन, अस्पृश्यतानिवारण, हरिजनसेवा, अस्पृश्यांना मंदिरे खुली करणे असा एकदम वेगळाच कार्यक्रम ते देत. यामुळे खूपच स्वातंत्र्यसैनिक गोंधळात पडत. त्यांना वाटे की, गांधीजींमुळे लढ्याची शक्ती दुय्यमतिय्यम कामांमध्ये दवडली जात आहे. परकी सत्तेविरुद्ध लढा द्यायला सबंध राष्ट्राची एकजूट केल्यानंतर मध्येच एखादा सामाजिक प्रश्न पुढे करून ते राष्ट्रात फुटीरता निर्माण होऊ देत आहेत, असे त्यांना वाटे. पण वास्तविक पाहता, राष्ट्रात एकी उत्पन्न








अनुक्रमणिका

करून जशी ते शक्ती उत्पन्न करीत होते तशीच तट पाडूनही ते शक्तीच वाढवीत होते. कारण, त्यांच्या अशा कृतीमुळे खालच्या जातीच्या लोकांना ताकद मिळत असे. त्या लोकांना आपल्या हक्कांची जाणीव त्यांनी करून दिली. गांधीजी जे साधू पाहात होते ते वैशिष्ट्यपूर्ण होते. सामाजिक परिवर्तन प्रथम की राजकीय स्वातंत्र्य प्रथम हा विवाद चालूच होता. त्यात, आधी व नंतर असा भेद न करता, दोन्ही चळवळी एकाच वेळी चालू ठेवायची असाधारण गोष्ट ते करीत होते. त्यामुळे दोन्ही प्रकारच्या शक्ती मुक्त झाल्या.

आपण आता अशा ठिकाणी येऊन पोचलो आहोत की, जागतिकीकरणाच्या संदर्भात आपली परंपरा लक्षात घेऊन कसे वागावे हे आम्हांला उमजत नाही. माझेच पाहा ना, आधुनिकतावादी भूमिकेवरून मी लेखनास सुरुवात केली. आधुनिक संकल्पनांच्या पोषणावरच भारतीय भाषांत लिहिणाऱ्या आपण बहुतेक लेखकांनी आपली निर्मितिक्षमता जोपासली आहे; सक्रीय परंपरेच्या आधारावर नव्हे. याउलट गांधी मात्र असे म्हणत की, भारतातच पाळेमुळे रुजलेल्या पण त्याच वेळी जगातील इतर संकल्पनांशी परिचित अशा व्यक्तीच सर्वाधिक सर्जनशील ठरतील. हे म्हणणे जरा परस्परविरोधी वाटते. पण लेखकाला दोन्हींची गरज असते हे खरेच आहे. तुम्ही जर फक्त भारतीयेतर संकल्पनांशी परिचित — केवळ वरपांगी परिचित — झालेले असाल तर संभवतः तुम्ही 'वैश्विक' (कॉस्मॉपॉलिटन) विचारवंत बनता. असे विचारवंत सर्व काळी सर्वत्र आपल्याला भेटतच असतात. ग्राम्शी नागरी आणि ग्रामीण विचारवंत असा भेद करतो. नागरी विचारवंत हे भांडवलशाही किंवा जागतिक शक्तींच्या उपयोगी पडतात. हे विचारवंत नीरक्षीरविवेक न करता नवनव्या संकल्पनांची उचलेगिरी करताना आढळतात. पण तुम्ही जर तुमच्या संस्कृतीत रुजलेले असाल तर रुजलेलेच राहता. केरळातील त्या प्रसिद्ध गुरूवायूर मंदिरसत्याग्रहाकरता गांधीजी गेले होते तेव्हा नंबुद्री ब्राह्मण व नायर पुढारी यांच्याशी त्यांची बोलणी झाली. गांधींच्या लक्षात आले की, कोणत्याही आधुनिक कल्पना-संकल्पनांच्या बाबतीत हे लोक आंधळे-बहिरे आहेत; ते त्यांच्या स्वतःच्या संस्कृतीत रुजलेले लोक होते. गांधींना त्यांच्याविरुद्ध लढा द्यावा लागला. सुरुवातीला त्यांच्याच भूमिका स्वीकारून त्या आधारे त्यांच्याविरुद्ध गांधींनी संघर्ष करून पाहिला. पण त्यांच्या मतांत काहीच परिवर्तन होईना. तेव्हा गांधींना सत्याग्रह जाहीर करावा लागला. उघडच आहे की, जुन्या विचारांना घट्ट धरून राहणे काय किंवा नवीन विचारांचा लगोलग स्वीकार करणे काय, कोणतेच एक पुरेसे ठरत नाही. परंपरेचे जतन आणि नव्या विचारांचा स्वीकार, दोन्हीही एकाच वेळी करता आले पाहिजे. प्रादेशिक भाषांतील बहुतांश लेखकांचे असेच झाले आहे.

मी पुष्कळदा म्हणालो आहे — आणि अजूनही ते म्हणत राहणे जरूर आहे — की भारतीय देशी भाषा या तगून आहेत कारण तथाकथित मागासलेले आणि अशिक्षित लोक त्या बोलतात. क्षणभर आपण आजच्या बंगलोरसारख्या एखाद्या शहरातील परिस्थिती लक्षात घेऊया. असे दिसते की, उच्चशिक्षित लोक केवळ इंग्लिशमध्ये व्यवहार करतात. जितके तुम्ही जास्त शिकलेले असाल तितक्या कमी भाषा जणू तुम्हांला येतात. पण मैसूर एस.टी. स्थानकावरचा एखादा हमाल घ्या. भले तो अशिक्षित असेल, पण तो तमिळ, तेलुगू, मल्याळी, उर्दू आणि कानडी बोलू शकतो. थोडे इंग्रजीसुद्धा त्याला समजते. तुम्ही जर उच्च स्तरावरील आय.ए.एस. ऑफिसर असाल तर जे काही तुम्हांला करायचे असेल ते केवळ इंग्रजी भाषेचा वापर करूनच करू शकता. कदाचित तुमची पत्नी किंवा मुले यांना स्थानिक भाषा थोडीशी येत असेल. त्यांना रस्त्यावर खेळायचे असते किंवा बाजारात जायचे असते ना! तर अशी चमत्कारिक परिस्थिती आहे की जितके तुम्ही जास्त शिकाल तितक्या कमी भाषा तुम्हांला येतील.

मित्रहो, क्षणभर थांबून विचार करूया, की इतकी शेकडो वर्षे आपल्या भाषा ज्यांनी जतन केल्या आहेत ते कोणते लोक आहेत? समजा, कोणत्या तरी काळी भारतातील प्रत्येकजण साक्षर असता तर काय झाले असते? तर बहुधा संस्कृत ही सर्वांचीच भाषा झाली असती; त्यानंतर, कालानुक्रमे, पर्शियन आणि आणखी नंतर इंग्रजी. परंतु आपल्या देशी भाषा टिकून आहेत कारण आम जनता संस्कृत नाही बोलत, ती देशी प्राकृत भाषाच वापरते. आपली महान महाकाव्ये, पुराणे, आपली संस्कृती यांची खरी वाहक हीच जनता आहे. कै. ए.के. रामानुजनना एक गोष्ट सांगायला फार आवडत असे. आपल्या अभिजन व लोकसंस्कृतीचे धागे कसे गुंफतशीर

अनुक्रमणिका

मिसळले गेले आहेत ते त्या गोष्टीवरून उघड होते. लोकांनी जरी संहिता मुळातून वाचलेली नसली तरी त्यांना त्यातील कथाभाग माहीत असतो. उदाहरणार्थ, कानडीत हजाराच्यावर रामायणे आहेत; ती लोकसाहित्याचा भाग आहेत. लिखित नाहीत; मौखिक आहेत. ती गायिली जातात वा कथन केली जातात. एका लोकरामायणातली ग्रामीण सीता, राम वनात निघाल्यावेळी त्याच्याशी वाद करते. राम तिला म्हणतो, "अग, माझ्याबरोबर वनात येऊ नंकोस. तू राजकन्या आहेस. तुझी पाउले कशी नाजुक आहेत, तुला त्रास होईल. शिवाय तिकडे वाघ, सिंह, साप हिंडतात. तू येऊ नकोस." ती आग्रह धरते की, "मी तुमची पत्नी आहे, मला बरोबर यायलाच हवे." तरीही रामाचा आग्रह चालूच राहतो. तेव्हा शेवटी ही सीता काय म्हणते माहीत आहे? ती म्हणते, "प्रत्येक रामायणात सीता वनात जाते असेच सांगितलेले आहे. मग मलाच का तुम्ही नाही म्हणता?" उघडच आहे की, या सीतेला इतर रामायणे माहीत होती. इथे एक तऱ्हेचा संहितांमध्ये परस्परसंबंध व आदानप्रदान आहे. सर्व कथा एकमेकींशी संबंधित असतात. वास्तविक पाहता इतर हजारो भाषांच्या जोडीला भारतात आणखी दोन भाषा खऱ्या आहेत. एक रामायणाची आणि दुसरी महाभारताची. त्या केवळ भारतातील शिक्षित लोकांना जोडणाऱ्या भाषा आहेत असे नव्हे तर आम जनतेला एकत्र आणणाऱ्या भाषा आहेत. तुळसीदास काय, Ezhuthachan काय दोघेही सामान्य जनतेकरताच लिहीत होते आणि शिवाय Ezhuthachan खालच्या जातीतील होते.

केरळमध्ये Ezhuthachan बद्दल अनेक मनोवेधक कथा प्रसिद्ध आहेत. एक कथा आहे, ते प्रसिद्ध नंबुद्री कवी भट्टतिरिपाद यांना भेटले त्याची. हे कविवर्य संस्कृतमध्ये रचना करीत. ते लिहू पाहात होते त्या भागवताची सुरुवात कशी करावी हे त्यांच्या लक्षात येईना. वृत्त कोणते वापरावे, विषयांची मांडणी कशी करावी वगैरेबाबत ते जरा अडखळत होते. ते केवळ विद्वान होते. मल्याळी लोक त्यांच्याविषयी सांगतात ती गोष्ट जरा गमतीची आहे, तुम्हांला माहीत आहे की केरळात प्रत्येकजण जेवणाची सुरुवात मासा खाऊन करतो. म्हणून, जेव्हा भट्टतिरिपाद Ezhuthachan ला विचारू लागले की, सुरुवात कशी करावी, तेव्हा ते म्हणाले, माशापासून. एका ब्राह्मणाला ते हे सांगतात हे लक्षात घ्या. त्यांच्या मनातला अर्थ होता मत्स्यावतारापासून सुरुवात करावी. भागवतपुराणात पहिला अवतार मत्स्यावतार म्हणून सांगितला आहे. Ezhuthachan सारखा खालच्या जातीतील माणूस एका श्रेष्ठ संस्कृत महाकाव्याला चालना देतो ही सांस्कृतिक पातळीवरची एक लक्षणीय गोष्ट आहे. त्याच्याजवळ तशी प्रतिभा होती. भट्टतिरिपादांना सांधेदुखीचा त्रास होत असे. त्याची आणखी एक कथा आहे. असे म्हणतात की, मल्याळीमध्ये लिहिलेले भागवत वाचायला त्यांची तयारी नव्हती. आपल्या सांधेदुखीवर उपाय म्हणून त्यांनी संस्कृतमध्ये भागवतकथा लिहिली आणि सांधे दुखायचे थांबलेही. पण मल्याळीमधील भागवत वाचायला नकार दिल्यावर सांधे परत दुखू लागले. मग देव त्यांना म्हणाला, 'अरे, तू विभक्तिप्रत्ययात गुंतून पडलास आणि खरी भक्ती ज्यात प्रकट होते आहे ती मल्याळी भागवतकथा तू नाकारलीस. पण तुला खऱ्या भक्तीचीच गरज आहे.' आता, मल्याळम् मध्ये अशा अनेक कथा आहेत. त्यातून हेच सिद्ध होते की, देशी भाषांतूनच सामान्य जनतेची संस्कृती उधाणास येते आणि समृद्धही होते.

आता विसाव्या शतकात पुन्हा देशी भाषांचा जोम वाढतो आहे आणि परंपरा व आधुनिकता दोहोंच्याही त्या वाहक बनत आहेत. माझेच उदाहरण मी प्रथम घेतले होते. ज्या परंपरेचा मी आहे तिचे भान माझ्या मनात अबोध, सुप्त स्वरूपात असते. जेव्हा तुम्ही स्वतःची भाषा वापरता तेव्हाच त्या सुप्त परंपरेची नस तुम्हांला सापडते. तुमच्या खोलवरच्या स्मरणातून ती शक्ती जाणवते. आणि तुम्ही ग्रामीण भागात वाढला असाल तर खेडेगावची सर्व जीवनशैली तुम्हांला परत आठवू लागते. तुम्हांला एक गमतीचा अनुभव सांगतो. मी इंग्लंडमध्ये जवळजवळ तीन वर्षे होतो आणि सदासर्वकाळ इंग्रजीच बोलणे भाग असे. इंग्रजीत बोलताना खूपदा मला अतिशय शीण जाणवतो. मार्टिन ग्रीन नावाचे एक थोर गांधीवादी तेथे आहेत. त्यांनी आपल्याबरोबर इंग्लंडच्या उत्तर भागात मला नेले. प्रवासात अजाणता मी त्यांच्याबरोबर कानडीत बोलायला लागायचो. बोलता बोलता ध्यानात यायचे की, या गृहस्थांना तर कानडी समजत नाही. पण या उफाळून आलेल्या कानडीमुळे मी माझी *संस्कार* ही कादंबरी थोडक्याच दिवसांत लिहू शकलो; कारण, माझ्या ग्रामीण भागातील आठवणींमुळे माझी सगळी भाषा माझ्यामध्ये अवतीर्ण झाली

होती. हे उदाहरण अशाकरता दिले की, ग्रामीण पार्श्वभूमी असलेले जे भारतीय विचारवंत देशी भाषांचा वापर करतात ते, ग्राम्शी म्हणतो तसे, परंपरा आणि आधुनिकता दोहोंच्याही संपर्कात असणारे ग्रामीण विचारवंत असतात हे लक्षात यावे. या विचारवंतांत द्वैत आढळते. त्याच्यासमोर ही शृंगापत्ती असते की, परंपरेच्या आधाराशिवाय त्यांना त्यांची देशी भाषा वारशाने प्राप्त होऊ शकली नसती. त्याच वेळी, आधुनिकतेचा आश्रय घेतल्याशिवाय नवीन संकल्पनांना ते सामोरे जाऊ शकत नाहीत आणि नव्या नव्या क्षेत्रांत सर्जनशील राहू शकत नाहीत. या दोहोंच्यात ताण फार तीव्र असतो. हे तुम्हांला बेंद्रे, कुर्वेपु आणि मास्ती या साहित्यिकांत दिसते. सगळ्याच थोर साहित्यकारांत हा, परंपरा आणि आधुनिकता यांतील ताण जाणवतो. म्हणूनच आपल्या काळाच्या दृष्टीतून त्यांचे साहित्य फार अर्थपूर्ण ठरते.

परंपरा आणि आधुनिकता यांपैकी कशाचाच त्याग न करता दोन्हींतील तणावाचे निराकरण कसे करावे? कोणत्या तरी क्षणी वाटते की, आपण आधुनिकतेच्या विरोधात आहो. पण पुढच्याच क्षणी लक्षात येते की, ज्या सुखसोयींची मला अपेक्षा आहे, जे ग्रंथ मला वाचावेसे वाटतात, ज्या लोकांशी मी चर्चा करू इच्छितो ते सगळे ज्याला आधुनिकतावाद म्हणावे त्याने संस्कारित झालेले असतात. कोणतीही टोकाची भूमिका घेणे म्हणून अप्रामाणिकपणाच होईल. याबाबत बऱ्याच मजेशीर गोष्टी सांगता येतील. तुम्हांला गोरूर रामस्वामी अय्यंगार यांचा एक किस्सा सांगतो. गृहस्थ कानडीतील चांगले लेखक. दिसायला छान परंपरावादी दिसणारे थोर गांधीवादी. त्यांनी मला एकदा सांगितले की, कोणी आंग्लविद्याविभूषित माणूस भेटला तर ते म्हणत, "आहे काय त्या इंग्लिशमध्ये? तुम्ही कालिदास वाचा; भास, भवभूती पाहा आणि भागवतही अभ्यासायला हवे. जर कोणी संस्कृतज्ञ भेटला तर त्याला सांगत, "अहो, नुसते संस्कृत ग्रंथ अभ्यासून पुरेसे नाही, तुम्ही शेक्सपियर आणि इतर उत्तमोत्तम युरोपीय लेखक वाचले पाहिजेत." हे सगळे जरा मजेशीर आहे आणि लक्षवेधकही आहे. कारण, मगाशी मी म्हणालो तसे, आपण कशाविरुद्ध बोलतो त्यावरून आपला पक्ष ठरत असतो.

१९ व्या शतकातील रशियन विचारवंतांची अशीच परिस्थिती होती. जे जे रशियन त्या त्या विषयी प्रेम आणि पाश्चात्त्यीकरणाची ओढ यात त्यांची रस्सीखेच होत असे. रशियन संस्कृतीचे केंद्र अशा मॉस्कोविषयी त्यांना ओढ असे आणि पीटर्सबर्गमध्ये राहावे असेही वाटे. पीटर्सबर्ग हे त्या वेळी प्रगल्भ नागरी युरोपियन संस्कृतीचे केंद्र होते. १९व्या शतकातील काही उत्तमोत्तम साहित्य या मानसिक तणावातून जन्मास आले आहे. टॉलस्टॉय वाचलात तर दिसते की, त्याची काही पात्रे श्रीमंत भारतीय स्त्रियांसारखी वागतात. ती आपल्या मुलांशी, नवऱ्याशी रशियनऐवजी फ्रेंचमधून संभाषण करतात. कारण की, फ्रेंचमधून बोलणे हे त्या काळी वरच्या वर्गात असल्याचे लक्षण होते आणि, दुसरे असे की, घरातील नोकरमंडळींना आपण भांडतो आहोत हे कळून द्यायचे नसे. या बाबतीत भारतीय आणि रशियन लोकांत बराच सारखेपणा आहे. परंपरा आणि आधुनिकता अशी एकत्र येताना ताण येतो. त्यातून सर्जनशीलता निर्माण होते. पण ही सर्जकता पुष्कळदा युरोपकेंद्री असू शकते. सगळ्या देशी भाषांत पहिल्यांदा लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्या पाहा. त्या लेखकांना परंपरेविषयी अतोनात उद्वेग आहे. अंधश्रद्धा आणि अन्याय याविषयी पराकोटीची चीड आणि तिरस्कार त्यांत दिसतो. त्यांना आपण बुद्धिवादी (रॅशनल) आहोत असे वाटते. कोणी कुमारव्यास, पंपा अथवा Ezhuthachan असे होऊन गेले, आपल्याला काही थोर परंपरा आहे याची त्यांना जाणच दिसत नाही. ही परंपरा त्यांना अत्यंत कुचकामी वाटते असे दिसते. तर कोणी अगदी तिय्यम दर्जाचा इंग्रजी लेखक त्यांचा आदर्श ठरतो. शेक्सपियर नव्हे हं. असे का? तर समाजात बदल घडवून आणावा, समाजातील अन्यायाचा प्रतिकार करावा, एका समर्थ राष्ट्राची उभारणी करावी याकरता वाटणारी आस अगदी खालच्या दर्जाच्या सवंग युरोपियन साहित्यातून या लेखकांनी मिळवली. माझ्या वाढीच्या वयात इंगरसोल (Ingersoll) ला फार प्रतिष्ठा होती. तो मोठा विचारवंत मानला जाई. भले अमेरिकेत त्याचे नावसुद्धा कोणी ऐकले नसेल. आमच्या गावात आम्हांला सांगत की रेनॉल्ड्स आणि इंगरसोल वाचायलाच हवेत. रेनॉल्ड्स तर तिसऱ्या दर्जाचा इंग्रजी लेखक. पण त्या दिवसांत त्याचे माहात्म्य फार होते. मला अजून त्याच्या त्या कादंबऱ्यांचे दोन खंड आठवतात. सगळ्या कथा अमीरउमराव स्त्री-पुरुष व त्यांची प्रेमप्रकरणे यांनी भरलेल्या आणि त्याही सगळ्या भुक्कड. इंग्लंडमध्ये रेनॉल्ड्सला कोण विचारत नव्हते पण इकडे तो श्रेष्ठ. हे ऐकायला चमत्कारिक वाटते. पण मला

वाटते, आधुनिकतेच्या पहिल्या सपाट्यात आपली परंपरा लुप्तच झाली. मॅक्सम्युलरमुळे तिचे भान काही काळाने आपल्याला परत आले. तरीही आमची प्रतिक्रिया अशीच की, पाहा, या युरोपियन माणसाने आमच्या वेदांचे भाषांतर केले. वेदातसुद्धा काही महत्त्वाचे असले पाहिजे, नाहीतर साहेब कशाला त्याचे भाषांतर करतील!

आता, म्हणजे या शतकाच्या शेवटीसुद्धा, मला वाटत नाही की परंपरा आणि आधुनिकता यांमधील तणाव आपण नाहीसा केला आहे. मला वाटते की, आम्ही काहीतरी गमावून बसलो आहोत आणि याच कळीच्या मुद्याला माझा युक्तिवाद मला भिडवायचा आहे. मी म्हैसूरमध्ये असताना पाहिले की, अय्यप्पा संप्रदायाकडे सर्व प्रकारचे लोक आकर्षित झाले होते. माझ्या माहितीचा एक हरिजन माणूस दारुड्या होता. बायकोला मारत असे. पण अचानक अय्यप्पाचा भक्त बनून त्याने चाळीस दिवसांचे व्रत आचरणे सुरू केले. बायकोपासून दूर, आपल्या इतर भक्तमित्रांबरोबर राहू लागला आणि मग शबरीमालाची ती कठीण यात्रा त्याने केली. चाळीस दिवस का असेना, पण तो सुधारला याचे बायकोला समाधान होते. मी तिला विचारले की, यात्रेहून परतल्यावर तो कसा वागेल? तर तिचे उत्तर असे : "तो जाईल त्याच्या जुन्या वळणावर. पण पुन्हा पुढल्या वर्षीही अय्यप्पाचे व्रत येणारच ना!" त्या आशेवर ती जगे. मग माझ्या लक्षात आले की, अय्यप्पा संप्रदाय आणि भक्तिमार्ग यात खूप सारखेपणा आहे. सगळ्याच भक्तिसंप्रदायांची काही वैशिष्ट्ये असतात. एक म्हणजे त्यातील भक्तांची मांदियाळी असते : ते एकत्र जमतात, गातात, भजन करतात. दुसरे म्हणजे, वैषयिक जीवन, मद्य अशा गोष्टींपासून तितके दिवस दूर राहतात आणि, तिसरे म्हणजे, या सर्व भक्तांमध्ये समता असते. त्यांच्यात उच्चनीचपणा नाही. एकदा तुम्ही अय्यप्पाचे भक्त झालात की, तुम्ही 'स्वामी' होता. मग जातिभेद नाहीत. ते चाळीस दिवस संपल्यावर तुमच्या जाती तुम्हांला परत चिकटतील. पण तेवढे दिवस जातपात नाही. वर वर पाहता अय्यप्पा संप्रदाय हा भक्तिसंप्रदायासारखा मला वाटला. ही चळवळ वाढताना मी पाहात होतो आणि तीविषयी खूप कुतूहलही होते. पण त्या चळवळीचा मीषण एक भाग आहे असे मला वाटले नाही. पूर्वीच्या काळात भारताचा इतिहास वेगळाच असावा असे ध्यानात आले. पूर्वीपासून श्रमण चळवळ इकडे आहे, आणि वैदिकही. १९ व्या शतकात मॅथ्यू आर्नोल्डने युरोपियन समाज हिब्रू आणि ग्रीक अशा दोन्ही परंपरांचा वारसदार आहे असे प्रतिपादन केले. तो म्हणाला की, जेव्हा ग्रीक परंपरेचा जास्तीच उदो उदो होतो तेव्हा हिब्रू परंपरा तिला ठीक जागेवर आणते आणि धार्मिक कर्मठपणा जास्त वाढू लागला तर ग्रीक परंपरा तिला तिची जागा दाखवून देते.

भारतातसुद्धा, एकमेकांच्या समोर दोन विरोधी भूमिका उभ्या ठाकलेल्या, सत्याला 'सामोरे' जाताना आढळतात. वैदिक परंपरेत निसर्गापासून जास्त बळ, सत्ता प्राप्त करून घेण्याची, यज्ञाच्या वा तपश्चर्येच्या द्वारे माणसाने देवांची बरोबरी करण्याची गोष्ट होती. ही परंपरा आणि जैन, बौद्ध परंपरा किंवा वीरशैव पंथासारखे इतर संप्रदाय — ज्यात शूद्रांचाही सहभाग असे — एकत्रच नांदत होते. या इतर चळवळी मोठ्या तीव्र स्वरूपाच्या, केव्हा केव्हा अतिरेकी स्वरूपाच्यासुद्धा असत. गांधीजी हे भारतातील श्रमण चळवळीचे फलित होते. पण श्रमण चळवळ ही केवळ श्रमणांची चळवळ राहू शकत नाही. त्यात वैदिक परंपरेचा काही अंश असतोच.

तेच वैदिक परंपरेचेही. त्यात श्रमण चळवळीची तत्त्वे मिसळतातच. जातिव्यवस्थेची कडक बंधने असूनसुद्धा या दोन्ही परंपरा एकत्र नांदल्या आणि भारतीय संस्कृती योग्य त्या मार्गावर राहिली. केरळातील एक इतिहासाचे प्राध्यापक एकदा म्हणाले की, जातिव्यवस्थेला पोर्तुगीज हिंदुस्थानात आले तेव्हा प्रथम आव्हान उपस्थित केले गेले. मला आश्चर्यच वाटले; कारण जातिव्यवस्थेची न्याय्यता प्रथम बुद्धाने आणि पुष्कळ नंतर बसव, कबीर, तुकाराम यांनी प्रश्नांकित केली होती. श्रमण परंपरेत आपल्याकडे पुष्कळच संत कवी होऊन गेले. त्यात थोड्या वैदिकांचाही मोठा सहभाग असणारच. हिब्रू आणि ग्रीक परंपरांप्रमाणे या दोन्ही परंपरा अलग अलग विकसत नव्हत्या. त्यांच्या मध्ये द्वंद्वात्मक नाते होते, ज्यामुळे उभय परंपरा विकास पावत राहिल्या. कोणत्याही एका विशिष्ट वेळी त्यातील एक जास्त वरचढ असेच. या ठिकाणी हा प्रश्न उपस्थित करण्याचे कारण एवढेच की, वरवरचे साम्य वगळता अय्यप्पा संप्रदाय ही भक्तीची परंपरा आहे असे मला वाटत नाही. भक्तिमार्गी परंपरा म्हणून माझा त्याला आंतरिक प्रतिसाद येत नाही. अय्यप्पा संप्रदायाची

दास संप्रदाय, वीरशैव संप्रदाय, वचन संप्रदाय यांच्याशी तुलना करून पाहा. येसुदास अय्यपांची भजने गातात. परंतु त्या परंपरेत महान काव्य उत्पन्न झाले नाही. एकूण ते काव्य, ते भजन बटबटीत व सवंग, उथळ वाटते. भक्तिमार्गातील साहित्यात — जेथे बसव, अल्लमा, तुकाराम, कबीर उत्पन्न झाले — जशी उच्च साहित्यमूल्ये दिसतात तशी अय्यप्पा संप्रदायात आढळत नाहीत. आधुनिक भक्तिसंप्रदायातही ती आढळत नाहीत. किंबहुना, या नव्या भक्तिमार्गाचा उपयोग हितसंबंधी लोक आपलेच घोडे पुढे दामटण्याकरता करतात असे दिसते. त्यातून काही चांगले तर निष्पन्न होत नाहीच ; पण कार्यशक्तीचा उपयोग चुकीच्या कारणांसाठी होतो आहे. काही दिवसांपूर्वी मी अय्यप्पा संप्रदायाबद्दल सविस्तर लिहिले होते. मला सुचवायचे आहे ते असे की, या शतकात श्रमण आणि वैदिक परंपरांची फारकत झाली आहे. गांधींनी जनतेला एकत्र आणले होते तेवढा काळ सोडला तर, अशी चळवळच उभी राहू शकली नाही, की जीमध्ये विचारवंत आणि सामान्य लोक यांचे मनोमीलन होईल. दोन्हींचा संयोग झालेला नाही. यात काहीतरी कुठेतरी चुकते आहे. भारतीयांची साधारण प्रवृत्तीच अशी आहे की, कुठेही ते तीर्थक्षेत्र उत्पन्न करतात. कर्नाटकात पाहा, जवळपास प्रत्येक खेड्यात एक भाविकांचे तीर्थस्थळ असते. एक संत इथे जन्मले, तर तिथे एक दास; असे करत करत उत्तर कर्नाटकमध्ये किती तरी अशी तीर्थस्थळे आहेत की तेथे कोणी ना कोणी सत्पुरुष जन्मलेला असतो. पण मग, नोआखाली हे आपणा भारतीयांसाठी तीर्थक्षेत्र का बनले नाही? बुद्ध जेथे जेथे गेला, त्या स्थळांपेक्षा नोआखाली कमी महत्त्वाची आहे का? नोआखालीत गांधीजींनी आश्चर्य मूर्तिमंत केले होते. त्या माणसाने अनवाणी पदयात्रेद्वारा मुसलमानांमधील शत्रुत्व व अविश्वास कमी करून जातीय विद्वेष शमवला होता. ते स्वतः शेवटी एका हिंदू माणसाकडून मारले गेले हे निराळे. मुस्लिमांच्या भावना शांत कराव्या आणि त्यांच्या अंतःकरणामधून शत्रुत्व नाहीसे करावे म्हणून त्यांनी अथक परिश्रम केले. ती एक परीक्षाच होती. तरीही हिंदू मन नोआखालीला तीर्थस्थळ म्हणून स्वीकारत नाही. गांधीजी येथे केंद्रबिंदू असूनही आपली धर्मभावना तेथे जागी होत नाही; ती आम्हांला सोडून जाते. आमची धर्मभावना परंपरेला एकनिष्ठ राहिली असती तर १५ ऑगस्ट व २६ जानेवारी आम्ही संपूर्णतया शोकदिन मानले असते. दुर्दैवाने, ते फक्त सरकारी सुट्टीचे दिवस मानले जातात. त्या दिवशी होणाऱ्या समारंभाला मंत्री येतात, जातात. पूर्वी म्हैसूरमध्ये दसरा हा केवढा मोठा सण-उत्सव असे. आमच्या मंत्रीगणांनी त्यात भाग घ्यायला सुरुवात केल्यापासून त्याचे उत्सव, सण हे स्वरूप नाहीसे झाले. कुठेतरी आमची श्रमण-परंपरा व वैदिक-परंपरा या एकमेकांपासून दुरावल्या आहेत. पूर्वी जी वैदिक परंपरा म्हटली जात होती, ती आता फक्त उच्च वर्ण किंवा सत्ताधारी वर्ग म्हणून उरली आहे. या वर्गात (लालूप्रसाद) यादव व त्यांच्यासारख्या इतर सत्ताधाऱ्यांचा मी समावेश करतो. लालूप्रसाद यादव आणि त्यांच्यासारखे इतर आज 'वैदिकां'तच मोडतात. ते केवळ नावापुरते तथाकथित खालच्या जातीचे आहेत म्हणून त्यांची सुट्टी केली जाऊ शकत नाही. सामान्य जनतेशी त्यांना काही देणेघेणे नसते. एकूण काय तर पूर्वी श्रमण व वैदिक एकत्र नांदत, ते आता विभक्त झाले आहेत.

श्रमण आणि वैदिक यांच्या एकमेकांशी चालणाऱ्या आदानप्रदानाचे माध्यम देशी भाषा होत्या, थोड्याच लोकांत वापरली जाणारी संस्कृत नव्हे. निश्चितच, बुद्धाने संस्कृत वापरली नाही. तो आम जनतेच्या भाषेतच उपदेश करीत असे. म्हणून मी म्हणतो की भारतीय भाषांची घडण अन्योन्याश्रयी, परस्परानुप्रवेशी आहे.

या देशी भाषा सामान्य लोकांच्या आहेत, निरक्षरांनी त्या जोपासल्या आहेत. त्यांनी संस्कृत, इंग्रजी आणि काही युरोपीय भाषांचेसुद्धा सात्मीकरण केले आहे. हे तुम्हांला टागोरांमध्ये पाहावयास मिळते. तुलसीदासांच्या रामायणात, अल्लम्माच्या वचनांत, आणि महान उपनिषदांतसुद्धा — आम जनतेने जतन केलेल्या सर्वच भाषांमध्ये ही प्रक्रिया पाहायला मिळते. म्हणून एका तऱ्हेने येथे श्रमण व वैदिक मिसळले, एकत्र आले. पण आज तसे घडत नाही.

शेवटी आपण जागतिकीकरणाच्या प्रश्नाकडे येऊ. जागतिकीकरणाने या शतकाचा शेवट येत आहे. मी मघाशी म्हणालो त्याप्रमाणे गांधीजींना युरोपियन धर्तीचे प्रबळ राष्ट्र उभारायचे नव्हते, एक सुसंस्कृत स्वायत्त नागरी समाज आकाराला आणायचा होता. युरोपीय तऱ्हेच्या राष्ट्राची उभारणी इथे अवघड आहे हे त्यांना दिसले होते. प्रत्येक युरोपियन राष्ट्राला त्या राष्ट्राची अशी एक भाषा, एक धर्म, एक

संस्कृती आहे. या बाबतीत भारत अगदी वेगळा आहे. इथे प्रचंड विविधता आहे. त्यामुळे पाश्चात्त्य धर्तीच्या राष्ट्र-उभारणीचा प्रयत्न इथे सफळ होणारच नाही. ही विविधता मान्य करूनच एक राष्ट्र इथे उभे राहिले पाहिजे. पण ते रूढ अर्थाचे राष्ट्र असणार नाही. ही विविधता फार महत्त्वाची आहे. फादर काप्पेन म्हणत की इथे एकजिनसीकरणाचा प्रयत्न करता कामा नये. ते खरेच आहे.

गांधींनी नेहरूंना आपला वारस का ठरवले याचा मला नेहमीच अचंबा वाटतो. नेहरू हे थोर होते, पण गांधींजींशी त्यांचे मूलभूत स्वरूपाचे मतभेद होते. वास्तविक, भारतात दोनच प्रमुख विचारप्रणाली आहेत. नेहरूवाद आणि गांधीवाद. भारतात मार्क्सवाद नाही. सगळे मार्क्सवादी हे मूलतः नेहरूवादीच असतात; आहोत असे ते कबूल करीत नाहीत एवढेच. केरळ ही एक सुंदर आणि परंपरा असलेली भूमी आहे. पण जेव्हा मार्क्सवादी आपल्या आंतरराष्ट्रीय परिषदा केरळात भरवतात तेव्हा सभास्थानी फक्त लेनिन, स्टॅलिन आणि मार्क्स यांचेच फोटो लावले जातात. Ezhuthachan चा नाही. खरे तर Ezhuthachan शिवाय मल्याळी भाषेची कल्पनाच करता येत नाही. तो खरोखरी जनसामान्यांमधून आलेला होता. मार्क्सवाद्यांनी त्याची उपेक्षा केली ही नवलाची गोष्ट नाही; कारण तेही नेहरूवादाप्रमाणेच युरोपकेंद्रीच आहेत. नेहरू भावनिकदृष्ट्या युरोपविरोधी होते पण बौद्धिक पातळीवर युरोपधार्जिणे होते. याउलट, बौद्धिक पातळीवर गांधीजी पश्चिमविरोधी (म्हणजे आधुनिक पाश्चात्त्य सभ्यता/व्यवस्था नाकारणारे) पण भावनिक पातळीवर युरोपशी एकात्म होते. युरोपशी एकरूप होण्यात गांधींना काही भावनिक समस्या नव्हत्या. त्यांच्या मते, युरोपियनसुद्धा आमच्यासारखीच माणसे आहेत; तेही आमच्यासारखेच जगतात, मरतात, दुःख भोगतात, प्रेम करतात. त्यांच्याशी भावनिक विरोध असण्याचे काही कारण नाही. गांधीजींचे काही निकटचे सहकारी ज्यू आणि ख्रिश्चन होते. बौद्धिक पातळीवर गांधींचे त्यांच्याशी काही मतभेद झाले असतील, पण भावनात्मक पातळीवर काही प्रश्न नव्हता. पण नेहरू, सुभाषचंद्र बोस आणि बहुतेक इतर भारतीय नेते हे मनातून युरोपच्या विरोधी होते पण बौद्धिक दृष्ट्या ते सर्वस्वी युरोपधार्जिणे होते. त्यांना इतर कोणत्या रीतीने विचार करताच येत नसे. गांधीजी हे राष्ट्रीय पुनरुत्थानाचे नेते होते म्हणून इतर पुढारी त्यांचे अनुयायित्व पत्करीत. नेहरूंनी तर स्वतः सूत कातून एक साडी विणली होती. ती साडी आता त्यांच्या नातवाची मुलगी वापरते. ती अजून जपून ठेवलेली आहे. हे एक कर्मकांडच आहे असे वाटेल. पण या रीतीने आपण काही गोष्टींची स्मृती जतन करीत असतो. नेहरूंनी ती साडी तुरुंगात असताना विणली असणार, पण त्यांनी साडी विणायचे ठरवले हे महत्त्वाचे. गांधीजींनी तेव्हा नेहरूंची निवड का केली असेल? त्यांना वाटले असणार की नेहरूंचा आत्मा अतिशय प्रगल्भ भावनाशील आहे आणि ते भारत आधुनिकतेच्या आहारी संपूर्णपणे जाऊ देणार नाहीत. परंपरा आणि आधुनिकता यातील तणाव त्यांना अधिक चांगला सांभाळता येईल. आधुनिकता संपूर्ण त्याज्य ठरवायची तरी किंवा संपूर्णतया स्वीकारायची तरी अशी दोहोंपैकी एक टोकाची भूमिका आपण जर पत्करली असती तर बहुधा भारतीयांनी त्या भूमिकेविरुद्ध लढा दिला असता. आधुनिकता पूर्णपणे नाकारण्याची आपल्याला सवडच नव्हती; ती आपल्यामध्ये सर्वांगांनी घुसलीच होती. शिवाय, आधुनिकता आणि परंपरा यांच्यातील आदानप्रदानाच्या द्वारेच आपण काहीएकाप्रकारे नवसर्जन करू शकणार होतो. म्हणूनही आधुनिकतेचा स्वीकार करणे आपल्याला भागच होते. स्व-पर या द्वंद्वात्मक जोडीतला युरोप हा 'पर' होता आणि 'स्व'ला अर्थपूर्ण आशय प्राप्त करून देण्यासाठी युरोप या 'पर'ची आपल्याला आवश्यकता होतीच.

पण आधुनिकतेचा स्वीकार आपण किती प्रमाणात करणार? या प्रश्नाचे उत्तर आता शोधले पाहिजे. त्यामुळे, नेहरूंची त्या वेळी गांधींनी केलेली निवड त्या दृष्टीने अटळच होती असे मागे वळून पाहता म्हणावे.

आता, भारताच्या विकासाचाही तर प्रश्न आहेच. आपणा सर्वांचा विश्वास होता की विकासाची ही मूलतः पाश्चात्त्य संकल्पना वापरून गरीब जनतेला अधिकाधिक नोकऱ्या, व्यवसाय मिळवून देता येतील, कारण विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्या साहाय्याने नवीन धरणे बांधता येतील, नवीन कारखाने सुरू होतील वगैरे, आणि त्यामुळे नवीन नोकऱ्याही. गांधीजींनी ही विकासाची संकल्पना नाकारली कारण आम जनतेला शिक्षण आणि व्यवसाय मिळवून देण्याविषयी त्यांच्या काही वेगळ्याच कल्पना होत्या. याबाबतीत गांधीजींना कामराजांचाही विरोध होता. त्यांचे म्हणणे होते की, परंपरागत शिक्षण देऊन जातिनिर्मूलन शक्य होणार नाही; सुताराचा मुलगा,






समजा, सुतारकीत बी.ई. झाला, तरी तो सुतारच राहाणार आणि जातिव्यवस्थेचा पगडा तसाच राहाणार. म्हणून आपल्याला आधुनिकता आणि आधुनिक शिक्षण दोन्हींचा परंपरेबरोबरच स्वीकार करायला हवा, असे त्यांचे व त्यांच्यासारख्या अनेकानेकांचे म्हणणे. समानता आणि सामाजिक न्याय ही एव्हाना नव्या भारताच्या उभारणीच्या संदर्भातील आपली उद्दिष्टे बनली होती. म्हणून मग आधुनिकता व आधुनिक शिक्षण यांचे स्वागत केलेच पाहिजे होते. त्या काळात हे सर्व घडणे उघडच अटळ वाटत होते. पण आज आता ते तितके अटळ होते असे मला वाटत नाही. आपल्याला जे पर्याय उपलब्ध आहेत असे सांगितले जाते तेवढेच पर्याय काही नाहीत हे दाखवून देण्याचे मार्ग खऱ्याखुऱ्या पर्यायी संस्कृतीने अनुसरले पाहिजेत. फादर काप्पेन यांच्यासारख्या व्यक्तींकडून स्फूर्ती, प्रेरणा घेऊन आम्ही आता खऱ्या पर्यायांच्या शोधात आहोत. जरी विकासाची आधुनिक संकल्पना तशी प्रामाणिक असली तरी, युरोपमध्येसुद्धा ट्रूमनच्या कल्पनेतील विकास शक्य झालेला नाही. पर्यावरणाबद्दल जागरूक असलेल्या नागरिकांनी विरोध केला तर जर्मनी, अमेरिकेत नवीन कारखाने उभारता येत नाहीत. त्यामुळे काय होते की, अशा तऱ्हेचे हानिकारक कारखाने अविकसित देशांत ढकलले जातात आणि यालाच जागतिकीकरण ही संज्ञा मिळते. अशा रीतीने विकासाचे रूपांतर जागतिकीकरणात झाले आहे. दुर्दैव असे की, या जागतिकीकरणाला आधीच्या काळात विकासाबरोबर आढळणाऱ्या आदर्शवादाचा स्पर्शसुद्धा दिसत नाही.

इथे थोडे अन्तर्मुख होऊन आत्मपरीक्षण करावे असे मला वाटते. परंपरेचा काच असह्य वाटणारे, परंपरेचा तिटकारा मनात दाटलेले आपल्यापैकी बहुतेकजण आपले मूळचे गाव सोडून जायच्या मागे होते. मला स्वतःला माझ्या जातीपासून लांब पळायचे होते. माझ्या आप्तेष्टांच्या कल्पना व त्यांची मूल्ये यांपासून दूर जायचे होते. मी माझ्या जातीबाहेर विवाह केला, इंग्रजी शिक्षण घेतले. तरी शेवटी मला कन्नडकडे परतावे लागले. मनू चक्रवर्ती ज्या ताणतणावांसंबंधी बोलत होता ते हेच. पण मी जर संपूर्णपणे आधुनिक झालो असतो तर यातली कोणतीही टोकाची भूमिका मला कुठेच पोचवणार नव्हती. माझी सर्जनशीलता अजिबात संपली असती. पण जातीबाहेर लग्न केल्यामुळे बंगलोर शहरामधील जयनगर-सारख्या परिसरात, जेथे बहुसंख्य हिंदू राहतात, आम्हांला राहणे जमेना. मग आम्ही कँप भागात राहू लागलो. इंग्रजीत सारा संभाषण-व्यवहार मी करू लागलो आणि जातिव्यवस्थेच्या बाहेर असणाऱ्या माणसांमध्ये वावरू लागलो. हे एक मोठे अपंगत्व उत्पन्न झाले; कारण आपली बरीच सांस्कृतिक देवघेव जातीच्या माध्यमातून चालत असते, अभिव्यक्त होत असते. जात ही आपल्या संस्कृतीच्या बऱ्याच भागाला पायाभूत आहे. आपल्या खाण्यापिण्याचे पदार्थ, त्याविषयीच्या सवयी, रीतिभाती आपल्या जातीवरच ठरतात. अशा अनेक गोष्टी. पण जेव्हा आपल्या जातीविरुद्ध तुम्ही बंड करता तेव्हा तुम्ही आधुनिक बनून जाता. अशा एका बिंदूपर्यंत येता की, मग तुम्ही आय.ए.एस. अधिकारी व्हायला हवे. म्हणजे असे की, शैक्षणिक प्रगती तुम्ही इतकी करता, आपल्या लोकांपासून इतके दूर जाता की, तुमची भाषाही निराळीच बनते, तुम्ही एक वेगळीच व्यक्ती बनता. याला पर्याय म्हणजे आपल्या जातिबांधवांना धरून राहायचे, लग्नसंबंधही जातीतच करायचा. पण त्यामुळे आपल्या छोट्या परिघाबाहेर जगण्याचा अनुभवच तुम्हांला मिळत नाही. परंपरा किंवा आधुनिकता दोन्हींजवळही या समस्येवर उत्तर नाही. जातिव्यवस्था आणि इतर संकल्पनां-विरुद्ध सजग कृतिशीलता फादर काप्पेनप्रमाणे आपणही बाळगली पाहिजे. पण त्याच वेळी आपली पावित्र्याची संकल्पनाही आपण जागृत ठेवली पाहिजे, नाहीतर आपले स्वत्वच आपण गमावून बसू. जागतिकीकरणाविरुद्ध लढा देताना हे भान आपण राखले पाहिजे. मंगलोरमध्ये कोजेंट्रिक्सच्या विरोधात जी मोठी सभा झाली त्याला श्री. मॅथ्यू उपस्थित होते आणि कोळणीही हजर होत्या. पावित्र्याच्या कल्पनेच्या स्पर्शाने, साध्या जीवनशैलीने तुम्ही प्रभावित असला तरच तुम्ही जिवाच्या कराराने कोजेंट्रिक्ससारख्या शक्तीविरुद्ध लढा देऊ शकाल नाहीतर नाही. आणि ही पावित्र्याची जाणीव आपल्याला परंपरेतून मिळते. जगण्याच्या परंपरागत रीतीनेच आपण आपले अस्तित्व टिकवू शकतो.

नाचणी आणि तांदूळ यांच्यासंबंधी कानडीत एक मजेशीर गोष्ट आहे. तुम्हाला ठाऊक आहे की, भातपिकाला पुष्कळ पाऊस लागतो. तसा काही नाचणीचे पीक घ्यायला लागत नाही. भात हे श्रीमंती खाणे तर नाचणी हे गरिबांचे. आपले एक भक्तिमार्गी कवी कनकदास यांनी ही गोष्ट सांगितली आहे. एकदा काय झाले की, भात व नाचणी (रागी) यांचे








अनुक्रमणिका

भांडण लागले. भात रागीला म्हणाले, "तुझा काही उपयोग नाही. कोणी मंत्राक्षता म्हणून रागी वापरत नाहीत; लग्नाच्या वेळेलाही नाही आणि मृत्युसंस्कारातही नाही. फुकट तू. मी बघ, सगळीकडे उपयोगी येतो." नाचणीला फार राग आला. ती प्रभू रामचंद्रांकडे तक्रार घेऊन गेली. प्रभूंनी सर्व ऋषिगणांची एक सभा घेतली, भांडण ऐकून घेतले आणि म्हणाले, तुम्हा दोघांनाही मी सहा महिने कैदेत टाकतो. सहा महिने तुरुंगात काढून दोघेही बाहेर आले तर तांदळाला बुरा येऊन त्याचा काहीच उपयोग करण्यासारखा राहिला नव्हता; नाचणी मात्र होती तशीच ताजी टवटवीत होती. नाचणीला रामचंद्रांबद्दल फारच आदर वाटला. रागीची बाजू घेतली म्हणून तो 'रागव' (राघव) झाला. ही गोष्ट अशाकरता सांगितली की, भूतकाळी भारतीयांचे मन सर्जनशील होते. ते आत्मपरीक्षण करू शकत. तुम्ही परंपरानिष्ठ आहात याचा अर्थ परंपरेने आलेली प्रत्येक गोष्ट स्वीकारली पाहिजे असे नाही. बसव किंवा तुकाराम यांच्याप्रमाणे तुम्ही परंपरेशी भांडण करू शकता. असे आपल्याशीच भांडण केल्यामुळे नवे उन्मेष येऊ शकतात. आज आपण जागतिकीकरणाविरुद्ध लढा देत असताना आपल्या परंपरेकडे जास्त जास्त झुकतो आहोत. लोक माझ्याकडे बोट दाखवितात आणि म्हणतात, "बघा ना, अनंतमूर्ती पूर्वी इतके धार्मिकतेविरुद्ध होते पण हल्ली किती धार्मिक झाले आहेत!' खरे काय ते मला सांगता येणार नाही. पण मला वाटते की, पावित्र्याचे भान मला कायमच राहिले आहे. पुढील गोष्ट सांगूनच टाकतो. पूर्वीप्रमाणेच आताही माझी मुलगी माझ्याशी या विषयावर परवाच वाद घालत होती. तेराव्या शतकातील प्रसिद्ध द्वैतवेदान्ती मध्वाचार्य यांचा जन्म उडुपीतील पाजका येथे झाला. शंकराचार्यांच्या जन्मग्रामी कालडी येथे जशी त्या महामानवाची स्मृतिदर्शक काहीही खूण नाही, तशीच पाजकामध्येही मध्वाचार्यांची काही खूण नाही. पाजकामध्ये गेली पंधरा वर्षे दगडांच्या खाणी काढणे सुरू आहे. तसा पाजक हा खडकाळच भाग आहे. पण आसपास काही लहान लहान डोंगर-टेकड्या आहेत. सुंदर आहेत. त्यांतील काहींवर छोटी देवळेही बांधलेली आहेत. उपरोधाची गोष्ट म्हणजे, तेथील एका मठाच्या प्रमुखांनीच हे खाणकामाचे परवाने दिले आहेत. ऐकून मला धक्काच बसला. लहानपणापासून मी मध्वाचार्यांचे तत्त्वज्ञान पचवीतच वाढलो. माझ्या कादंबऱ्यांतून मी त्यांच्यावर खूप टीका केली आहे म्हणून काय झाले? मध्वाचार्यांच्या तत्त्वज्ञानावर माझ्यासमोरच लोक चर्चा करीत. त्या चर्चेतून मला एक स्पष्टपणे जाणवले की, भारतीय तत्त्वज्ञान्यांमध्ये मध्वाचार्य एकटेच असे आहेत की ते मान्य करतात की, हे आपल्या भोवतीचे जग क्षणभंगुर आहे पण तरी ते सत्य आहे. यात थोडा ख्रिश्चन धर्मतत्त्वांचाही प्रभाव असू शकेल. १३ व्या शतकात या विषयावर वादविवाद होऊ लागले होते. देव एकच आहे. तो म्हणजे विष्णू. हे ख्रिश्चनांप्रमाणेच एकदेवत्व झाले.

तरी ख्रिस्ती धर्मातही देवदूत, त्यांच्या श्रेष्ठकनिष्ठ श्रेणी हे आहेच. तुम्ही मिल्टन वाचलात तर देवदूतांच्या श्रेणी कशा बनवल्या आहेत हे कळेल. मध्वाचार्यांनी जग हे सत्य आहे अशा मुद्यावरच वादविवाद केले. माणूस हा माणूस आहे आणि देवाहून तो भिन्न आहे. भक्ती हा देव आणि मानव यांच्यातील नातेसंबंध आहे, ज्ञान नव्हे. हे तत्त्वज्ञान अद्वैत तत्त्वज्ञानाहून एकदम वेगळे आहे. असो. पण पाजकाहून परत आल्यावर मला झोप लागेना. मध्वाचार्यांना जग सत्य आहे ही खात्री कशी झाली असेल? तर पाजकाचे खडक पूर्वीपासून आहेतच आणि पुढेही असणार आहेत. या टेकड्यांभोवती फेऱ्या मारणाऱ्या लहान मध्वाच्या कितीतरी कहाण्या प्रचलित आहेत. एका गोष्टीत तर, वासराचे शेपूट धरून वासरू जाईल तिकडे मध्व जात असत, असे आहे. काय होते की तुम्ही भक्ती करता तेव्हा जे पारलौकिक आहे ते तुमच्यावर मात करते. लौकिक गोष्टींतूनच प्रगट झालेले पारलौकिक मग एक स्वतंत्र तत्त्वच बनून राहाते, आणि मग छोट्या मध्वाने जे खडक, ज्या टेकड्या पाहिल्या त्या आता नष्ट झाल्या आहेत हेही तुमच्या दृष्टीत भरत नाही. त्या खडकांनी त्याला काहीतरी शिकवले असले पाहिजे. आपल्या जाणिवेची निर्मिती निसर्गच करतो हे वर्ड्सवर्थ उलगडून दाखवतो. निसर्ग हा मानवी जाणिवेचा एक निर्माता असतो. या खाणकामामुळे अस्वस्थ होऊन मी जिल्हाधिकाऱ्यांना एक पत्र लिहिले. आता या टेकड्या वाचविण्यासाठी एक चळवळ उभी राहात आहे. या टेकड्यांना भेट देण्यासाठी येणाऱ्या दर्शनोत्सुकांत अंगात सदरा न घालता उघड्याने येणाऱ्यांचा भरणा असतो. त्यांच्या तुलनेत मला मी एकदम आधुनिक वाटतो. हा त्यांचा माझा जुळून आलेला संबंध महत्त्वाचा आहे. पण जर कोणी माझ्यासमोर मध्वाचार्यांच्या तत्त्वज्ञानाचे


अनुक्रमणिका

समर्थन करू लागला तर मी त्याच्याशी भांडेन. कारण, शंकराचार्यांना मी राक्षस मानीत नाही. मध्वाचार्यांच्या काही उपपत्तींविषयी मला सहानुभूती नाही, परंतु मध्वाचार्यांविषयी आहे. आज जागतिकीकरण आणि व्यापारीकरणाच्या विरोधात चळवळ केव्हा शक्य होईल, तर आपल्या परंपरेच्या द्वारा पावित्र्याचे भान तुमच्या ठायी उत्पन्न झाले तर. पण त्याच वेळी परंपरेत ज्या त्रुटी, उणिवा आहेत त्यांचीही आपल्याला जाण हवी. आपण दोन्हीही बाजू सांभाळायला हव्या. केव्हा तुम्ही अगदी परंपरानिष्ठ आहात असे दिसेल, तर केव्हा संपूर्ण आधुनिक. लोक काय म्हणतील याची चिंता करता कामा नये. तुमच्या कृतींमधून तुम्ही कसे आहात हे दिसले पाहिजे. हळूहळू लोकांना त्याची जाणीव होईल. पावित्र्याचे भान, त्याचा स्पर्श आपण पुनरपी प्राप्त करून घेतला पाहिजे. पण त्याच वेळी विचक्षण दृष्टिकोन बाळगून, परंपरेत राहून तिचे टीकाकार बनले पाहिजे. वैज्ञानिक ज्ञान भारतीयांना आज महत्त्वाचे वाटते आहे; तरी, शेवटी, ते आपल्या विनाशाला कारणीभूत ठरणारे आहे. म्हणून त्या ज्ञानाच्या लाटेत वाहून, बुडून जाता कामा नये. आपण जेव्हा मंगलोरमध्ये (कोजेंट्रिक्सच्या विरोधात) भेटलो तेव्हा मला आनंद वाटला की, श्री. मॅथ्यू हे विधिज्ञ, श्री. शर्मा हे शास्त्रज्ञ आणि उडुपी मठाचे यती हे एकच समान हेतू बाळगून कृती करण्यासाठी एकत्र आले. खडावा घालून लांबपर्यंत चालता येणार नाही म्हणून ते संन्यासी अनवाणी चालले. मी त्या जथ्याबरोबर होतो. शूद्र, हरिजन, मुस्लिम या सगळ्यांच्या समवेत हे तरुण संन्यासी मिसळलेले पाहून मला अगदी भरून आले. त्यांचे सर्वांचे प्रतिनिधी — विचारवंत, संन्यासी, ख्रिश्चन धर्मगुरू आणि कोळी स्त्रिया — व्यासपीठावर होते. ते सगळेच जागतिकीकरणाच्या विरोधात होते. जेव्हा विचारवंत आम जनतेत मिसळतात, तेव्हा गांधीजींच्या म्हणण्याला पुन्हा एकदा अर्थ प्राप्त होईल. एक नवीन सामाजिक जाणीव उत्पन्न होते आहे असे दिसते. आता, हे खरेच आहे की, रशियात जसा मार्क्सवाद पराभूत झाला तसा भारतात गांधीवाद पराजित झाला. कोणी गांधींच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे वागताना दिसत नाही. मार्क्सवादातील अत्युत्तम भाग अजून जिवंत आहे कारण मार्क्स हा खरोखरीच एक द्रष्टा माणूस होता. भांडवलशाही अर्थव्यवस्थेत सर्व उत्पादन हे केवळ विक्रेय-वस्तूंचे उत्पादन कसे ठरत जाते हे मार्क्सनेच प्रथम दाखवून दिले. त्या वेळी युरोपमध्ये रेल्वेमार्गांचे जाळे मोठ्या प्रमाणावर तयार होत होते. लोक त्यासाठी पागल झाले होते. पण रेल्वेमुळे बाजारपेठा तयार होतील हे मार्क्सने मर्मज्ञतेने हेरले. परंपरेबाबत, व्यवहार करताना काय टाकावे, काय ठेवावे यासंबंधी एक मर्मदृष्टी गांधीजींनी प्रकट केली व आपल्याला दिशा दाखविली. प्रा. अ.भि. शहांनी एकदा मला ही गोष्ट सांगितली. बनारसच्या पंडितांशी झालेल्या चर्चेसंबंधी गांधीजी तर्कतीर्थांशी — एक मोठे मराठी विद्वान — बोलत होते. गांधींनी पंडितांना विचारले की, वैदिक परंपरेला अस्पृश्यता मान्य आहे काय? पंडित म्हणाले, मान्य नाही. का, तर वैदिक मानतात की सर्व जग एकच आहे आणि आपणा सर्वांत एकाच देवाचा अंश आहे. अस्पृश्यतेला धार्मिक मान्यता नाही हे सिद्ध करण्याकरता आपणांस वेदांचा आधार घेता येईल. पण इथे उच्चतम मूल्ये आणि अन्याय्य, टाकाऊ सामाजिक प्रथा एकेजागी नांदताना दिसत आहेत. तरी बनारसचे पंडित, हे सर्व एकाच विश्वाचे अंश आहेत असे म्हणत होते. तर्कतीर्थही चांगले संस्कृत विद्वान होते. ते म्हणाले की, वेदांची अस्पृश्यतेच्या प्रथेला मान्यता आहे असेही दाखवून देता येईल. गांधीजी त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीने म्हणाले की, मग मला या मुद्यावर हिंदू धर्माला विरोध करावा लागेल. जर कोणाचा विरोध असेल तर दोन्ही गोष्टी शेजारी शेजारी ठेवाव्या लागतील. तुमच्या पावित्र्याच्या भावनेला ही या धर्मातील चूक दिसते. आता शतकाच्या शेवटाला ही भावनाच महत्त्वाची आहे. आपल्या आर्थिक, राजकीय विकासक्रमात ही जाणीव ठेवली पाहिजे. अल्लम्मा, ब्लेक, टॉलस्टॉय हे आपले साहित्यिक व सांस्कृतिक धुरीण, आदर्श असले पाहिजेत. आपला जो महान भूतकाळ आहे तोच आपल्या सामर्थ्याचा उगम असला पाहिजे. *Tradition, Modernity, Counterculture* या ग्रंथाने मला असा विचार करायला प्रवृत्त केले. फादर काप्पेनसारखे लोकच आजच्या काळाशी खरे संबंधित आहेत. माझे भाषण शांतपणे ऐकल्याबद्दल आभार.

●●

इंग्रजी की हिन्दी — हा प्रश्न वास्तविक सर्व आक्षेपांचा योग्य विचार करून कागदावर तरी उत्तर मांडून आपण सोडविला आहे. हिन्दीच्या बाजूनें राष्ट्र कौल देऊन चुकलें आहे. तथापि कोणाहि विचारकाला भिन्न मत मांडण्यास केव्हांहि मुभा राहिलीच पाहिजे. वास्तविक पाहतां 'इंग्रजी कीं हिंदी' हा प्रश्न आतां जिता-जागता राहिलेला नाहीं. तो 'मृत' समजला तरी चालेल. तरी 'पूर्वनिर्णीत' 'रेस जुडिकेटा'चा न्याय तात्त्विक क्षेत्रांत केव्हांच लागू करू नये. म्हणून व्यवहारी जगांत जरी एखादा विचार 'मृत' कोटींत गेलेला असला तरी बौद्धिक अथवा तात्त्विक क्षेत्रांत कोणचाहि विचार कधींच 'मृत' समजला जात नाहीं. एवढ्याच साठीं जरी कर्वे यांनी उपस्थित केलेल्या सर्व मुद्द्यांचा विचार होऊन गेलेला असला तरी पुनरपि विचार करण्यास चिंता नाहीं. त्यामुळें 'मृतमारणा'चा आक्षेप ग्राह्य ठरणार नाहीं. वैचारिक क्षेत्र हें अनिर्बंधच समजलें पाहिजे.

## इंग्रजी आणि हिन्दी*

- डॉ. सुनीतिकुमार चतर्जी

भारतीय भाषाविषयक प्रश्न गेलीं कांहीं वर्षे अत्यंत गुंतागुंतीचा झाला असून अलीकडे तर त्या प्रश्नानें भारतीय राजकारणांत व शिक्षणक्षेत्रांत मोठें स्वरूप धारण केलें आहे. अशा या जटिल प्रश्नावर डॉ. इरावती कर्वे यांनीं अत्यंत समंजस आणि निर्विकार भूमिकेवरून विवेचन केलेलें आहे. यासारख्या प्रश्नावर मतें मांडतांना शास्त्रशुद्ध वस्तुनिष्ठ दृष्टिकोन आढळून येणें विरळाच. तो दृष्टिकोन डॉ. इरावती कर्वे यांच्या लेखांतून प्रत्ययास येतो हे विशेष होय. त्यांनीं या प्रश्नाचा वस्तुनिष्ठ अभ्यास करून आपलीं मतें प्रांजलपणें मांडलीं आहेत. त्यांचीं सर्वच मतें जरी आपल्याला मान्य झालीं नाहींत, तरी त्यांचा विचार होणें योग्य होय.

ज्या प्रदेशांतून जनतेची मातृभाषा हिंदी किंवा उर्दू आहे व तीच शिक्षणाची, राज्यकारभाराची, सार्वजनिक जीवनाची, वाङ्मयाची भाषा म्हणून स्वीकारली गेली आहे, त्या प्रदेशांतील लोक आपल्याला हिंदीचें महत्त्व आज इतक्या जोरानें सांगत सुटले आहेत कीं, त्यामागें त्यांची आक्रमक वृत्ति दिसून आल्याशिवाय राहात नाहीं. त्यामुळें हा भाषाविषयक प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा होऊन बसला आहे. भारत हें आपलें सर्वांचें एक-राष्ट्र आहे ही भावना सर्वसाधारण भारतीय नागरिकांच्या ठिकाणीं रुजली असून, एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेला एक भाषा असणें आवश्यक आहे ही भूमिकाहि सर्वांनीं स्वीकारिली आहे, हें खरें. परंतु हिंदी-भाषिकांची ही आक्रमक वृत्ति पाहून लोक भयाकुल झाले आहेत. डॉ. कर्वे यांनीं म्हटल्याप्रमाणें, हिंदीला देऊं केलेल्या स्थानाविरुद्ध जर कोणी बोलायला उठलें तर जणूंकाय देशद्रोह होत आहे असें भीतिग्रस्त वातावरण उत्पन्न होऊं पाहात आहे!

वस्तुस्थिति अशी आहे कीं, हिंदी भाषा — म्हणजे संस्कृतप्रचुर खडी बोली हिंदी — ही अगदीं अलीकडची भाषा आहे. १८५० पूर्वी तिला कांहींच महत्त्व, किंबहुना अस्तित्वहि नव्हतें. ज्या कांहीं ग्रंथांमुळें खडीबोली हिंदीला कांहीं महत्त्व येऊं लागलें, ते ग्रंथ ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या प्रेरणेनें कांहीं उत्तर-हिंदुस्थानी पंडितांनीं रचले. हिंदीचें आधींचें जुनें प्राचीन वाङ्मय निदान चार निरनिराळ्या बोलींतून होतें. अवधी किंवा कोसली, पंजाबी, राजस्थानी (डिंगल किंवा जुनी मारवाडी) आणि व्रजभाषा या त्या चार बोली होत. या चार बोलींपैकीं व्रजभाषा हीच खरी खडी बोली हिंदीची सहोदर असून, इतर तीनहि बोली भाषाशास्त्रदृष्ट्या एकमेकांपासून भिन्न आहेत. पण गेल्या चार पिढ्यांच्या अवधींत, बंगाल व ओरिसाच्या पश्चिमेकडे, पूर्व पंजाबच्या पूर्वेकडे, गुजरात-महाराष्ट्र, तेलुगु-गोंड प्रदेशांच्या उत्तरेकडे, व नेपाळच्या दक्षिणेकडे असलेल्या प्रदेशांतील सर्वच भाषा व बोली यांनी खडीबोली हिंदीचें श्रेष्ठत्व मान्य केलें आहे. आज भारतांतील सुमारें १५ कोट लोक हिंदीभाषी किंवा हिंदीचा उपयोग करणारे म्हटले जातात. हिंदी भाषिकांचा हा १५ कोटि लोकांचा 'हिंदी संसार' समजला जातो. परंतु या १५ कोटीच्या 'हिंदी संसारा'पैकीं जेमतेम ५ कोटीच खरे हिंदीभाषी म्हणतां येतील. या पांच कोट लोकांत दोन प्रकारच्या लोकांचा समावेश होतो. एक म्हणजे उत्तर हिंदुस्थान व दक्खन यांतून विखुरलेले बहुतेक मुसलमान व कांहीं हिंदु — ज्यांची भाषा उर्दू आहे असे. दुसरे म्हणजे कनौजी, व्रजभाषा, बुंदेली, जनपद-हिंदुस्थानी,

* लेखकांनीं मूळ इंग्रजींतून पाठविलेल्या लेखाचा हा मुक्त अनुवाद आहे. - का.सं.



अनुक्रमणिका

जातु किंवा बांगरू या 'पश्चिम हिन्दी' भाषा बोलणारे लोक. उत्तर हिंदुस्थानांतील वरच्या निवडक वर्गांवर परवापरवांपर्यंत मुस्लिम प्रवृत्तीचा व संस्कृतीचा प्रभाव पडला होता. त्यांची भाषा उर्दू आहे हें त्याचें प्रतीक होय. अलीकडे हिंदु पुनरुज्जीवनाच्या चळवळीमुळें, वरील उर्दूभाषिकांपैकीं हिंदुलोक एक नवीनच भाषा — एका बाजूला बंगाली, गुजराती, मराठी यांच्या व दुसऱ्या बाजूला जुनी अवधी व जुनी व्रजभाषा यांच्या पंक्तींत जाऊन बसूं शकेल अशी — निर्माण करीत आहेत.

पश्चिम हिंदी बोली बोलणारे — विशेषतः दिल्लींत व दिल्लीच्या आसपास राहाणारे, मीरत, रोहिलखंड, पूर्व पंजाब यांतून राहाणारे लोक —, त्यांतील हिंदूसुद्धां, फारशीप्रचुर हिंदी बोलतात. मुसलमान राज्यकर्त्यांशीं संबंध आल्यापासून, गेलीं पांच शतकें संस्कृतचा अभ्यास नामशेष होऊन फारशीचा अभ्यास वाढत गेल्यामुळें तेथील हिंदूंच्याहि ही फारशीप्रचुर भाषा अगदीं अंगवळणीं पडून गेली आहे. पूर्वेकडील अवधी आणि विहारी बोली बोलणाऱ्यांची मात्र अशी प्रवृत्ति बनली नाहीं. फारशीप्रचुर पश्चिम हिंदीच्या कक्षेबाहेरील हे लोक, त्याचप्रमाणें आर्यसमाजासारख्या हिंदु-पुनरुज्जीवनवादी संघटनांनी प्रभावित झालेले पंजाबमधील व दिल्ली-मीरत-बुंदेलखंडमधील लोक हे आज संस्कृतशीं नष्ट झालेला संबंध पुन्हां प्रस्थापित करीत आहेत. हिंदी भाषेला संस्कृतचा वारसा पुन्हां प्राप्त करून देऊन, उर्दू वातावरणापासून ती मुक्त करून बंगाली, मराठी, गुजराती या भाषांच्या पंक्तीला तिला आणून ठेवण्याच्या महान् आंदोलनाला याच लोकांचा जोराचा पाठिंबा आहे.

म्हणूनच हिंदी भाषेचा निर्विकार दृष्टीनें अभ्यास होणें आवश्यक आहे. पण आज, दुर्दैवाने, या भाषेच्या अभ्यासाच्या बाबतींत राजकीय पूर्वग्रह, अभिनिवेश यांचा पगडा बसून आपली दृष्टि इतकी गढूळ झाली आहे कीं, वस्तुस्थितीकडे तीमुळें आपली डोळेझांक होत आहे. त्यामुळें निर्विकार दृष्टीनें या प्रश्नाचा अभ्यास करणारे विरळाच आढळतात.

हिंदी भाषेच्या प्रश्नाबाबत आज परिस्थिति थोडक्यांत मांडावयाची तर अशी मांडतां येईल :

(१) भारतीय राज्यघटनेंत देवनागरी लिपींतील खडी-बोली हिंदी ही भारतीय संघराज्याची भाषा असावी असें नमूद केलें आहे. मात्र आरंभीं पंधरा वर्षें इंग्रजी राहूं द्यावयाची आहे.

(२) खडी-बोली हिंदीला स्वतंत्र भाषेचें — स्वतःचें कांहीं वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मय जींत आहे अशा भाषेचें — स्थान अलीकडे १५० वर्षांतच आलें आहे. त्याआधीं, खडी-बोलीला अशा वाङ्मयीन भाषेचें स्थान मिळण्याच्या खूप आधींपासून, गंगेच्या खोऱ्यांतील प्रदेश, गंगेच्या खोऱ्याच्या दक्षिणेकडील प्रदेश व राजपुताना, माळवा — या भागांतील भाषा व बोली भरभराटीस आलेल्या होत्या व त्यांच्यांत समृद्ध असें पंडिती व लोकवाङ्मय निर्माण झालें होतें.

(३) खडी-बोली हिंदी ज्यांची मातृभाषा आहे असे लोक, विशेषतः शहरांतून राहाणारे लोक, यांची भाषा आतांपर्यंत फारशीप्रचुर उर्दू होती. संस्कृतप्रचुर हिन्दी त्यांना एक नवीन भाषेसारखीच वाटते. परंतु आज 'हिन्दी संसारा'मध्ये स्वतःची गणना करून घेणाऱ्या लोकांना, विशेषतः मैथिली, मागधी, भोजपुरी, छत्तीसगडी, बघेली, अवधी, गढवाली, कुमावनी, राजस्थानी बोली, हिमालयी बोली ह्या ज्यांच्या मातृभाषा आहेत अशा लोकांना आज संस्कृतप्रचुर हिन्दीबद्दल जिव्हाळा वाटूं लागला आहे.

(४) हिन्दी भाषेच्या स्वरूपाबद्दल आज तीव्र स्वरूपाचा झगडा चालूं आहे. एका बाजूला उर्दू वळणाची पश्चिमी हिन्दी आणि दुसऱ्या बाजूला खडी-बोली हिन्दी असे दोन तट निर्माण झाले आहेत. संस्कृतप्रचुर हिन्दीचा काँग्रेसनें व लोकसभेनें स्वीकार केला असून सरकार-दरबारीं तिला मान्यता मिळाली आहे. ही संस्कृतप्रचुर हिन्दी इतर भाषिकांना, उदा. आसामी, बंगाली, ओरिया, गुजराती, मराठी या भाषांच्या भाषिकांना तसेंच तेलुगु, कन्नड, तामिळ, मल्याळी या द्राविडी भाषा बोलणाऱ्यांनाहि समजूं शकते; कारण या सर्व भाषिकांनीं आपली संस्कृतची परंपरा कायम राखिली आहे. असें असूनहि फारशीप्रचुर उर्दू वळणाच्या हिन्दीचा वापर सिनेमामधून व शहरवासी सुशिक्षित लोकांच्या बोलण्यांतून जोरानें चालूच आहे.

हिन्दीभाषिक प्रदेशांमधून सर्वच्या सर्व इंग्रजी शास्त्रीय पारिभाषिक शब्दांऐवजी संस्कृत किंवा नवसंस्कृत पारिभाषिक शब्द योजून हिंदीचें आधुनिकीकरण करावयाचे प्रयत्न हल्लीं जारी आहेत. शास्त्रीय पारिभाषिक इंग्रजी शब्दांऐवजी संस्कृत शब्द उपयोगांत आणले कीं भाषा आधुनिक झाली असें कांहीं सज्जनांना वाटतें. पण भाषा जर खरी आधुनिक बनायची असेल तर ती भाषा बोलणारे लोक स्वतः आधुनिक








वृत्तीचे बनले पाहिजेत, मध्ययुगीन व मागासलेली मनोवृत्ति व प्रवृत्ति त्यांनीं सोडून दिली पाहिजे. मध्ययुगीन मनोवृत्तींतून लोकांची मुक्तता व त्या लोकांच्या भाषेचें आधुनिकीकरण खऱ्या लोकशिक्षणानेंच होऊं शकेल. उत्तर हिंदुस्थानांतील आपला 'हिंदी संसार' थाटणाऱ्या लोकांची सर्व भारताला आपण मार्गदर्शन करावें अशी इच्छा आहे खरी; परंतु त्यांनीं जी खडी-बोली हिन्दी स्वीकारली आहे ती अगदीं अलीकडची आहे. ती भाषा स्वीकारून तिचें संवर्धन करावयास जेमतेम दोनतीन पिढ्याच झाल्या असतील. हे स्वतः हिंदीभाषी लोक भारतांतील इतर भाषिकांच्या मानानें पुढारलेले नाहींत; उलट, पुष्कळ बाबतींत समुद्र किनाऱ्यालगतच्या प्रदेशांतील भाषिकांच्या मानानें ते मध्ययुगीन वाटण्याइतके मागासलेले आहेत. त्यामुळें हिन्दीचें आधुनिकीकरण व्हायच्या आड पुष्कळच अडचणी आहेत. आज तर अशी स्थिति आहे कीं, इतर भाषिकांना हिन्दी ही स्फूर्तिस्थान बनावयाच्या ऐवजीं कुचंबणेला व अडवणुकीलाच कारण होऊं पाहात आहे. माझा तर असा अनुभव आहे कीं, दुय्यम शाळांतील खालच्या इयत्तांतील मुलांना बंगाली व हिन्दी या दोन्हीहि सजातीय भाषा एकाच वेळां शिकविल्यामुळें कोणतीहि एक भाषा मुलाला नीट शुद्ध येत नाहीं. म्हणून मी तरी अशी शिफारस केली आहे कीं, हिन्दी भाषा विद्यार्थ्याला कॉलेजमध्यें गेल्यावर, मातृभाषा त्याला साधारणपणें चांगली येऊं लागल्यावरच शिकवावी.

हिन्दीतर भाषिकांच्या प्रदेशावर एका नवीन हिन्दी भाषेचें ओझें लादून बौद्धिकदृष्ट्या कांहींहि फायदा होणार नाहीं. अखिल भारतीय नोकऱ्यांच्या परीक्षांना हिंदीचें ज्ञान आवश्यक राहील पण तें केवळ एक भूषण म्हणून. बंगाली, मराठी, ओरिया, तामीळ इत्यादि ज्यांच्या मातृभाषा आहेत अशा भाषिक लोकांच्या प्रदेशांत अखिल भारतीय शैक्षणिक कारभारांमध्यें सध्यांच्या इंग्रजीऐवजीं हिन्दी प्रस्थापित करण्याचा प्रश्नच उद्‌भवूं शकत नाहीं. हिन्दी भाषी लोकांनाहि इंग्रजीची अगदीं जिव्हाळ्याची गरज आहे. इंग्रजी भाषा हें आज जागतिक संस्कृतीचें अत्यंत महत्त्वाचें वाहन आहे. कांहीं भाषा खरोखरी इतक्या प्रगत अवस्थेला पोहोंचलेल्या असतात कीं त्यांचा नुसता परिचयहि आपल्या मानसिक शक्तींच्या विकासास कारणीभूत होतो. इंग्रजी भाषा ही अशी आहे. इंग्रजी भाषा चांगली अवगत होण्यानें बुद्धीला तर उत्तम वळण लागतेंच; याशिवाय जो बौद्धिक ज्ञानलाभ होतो त्याचें महत्त्व व उपयोग खूपच आहे. आज इंग्रजी भाषा अशा एका श्रेष्ठ अवस्थेला पोहोंचली आहे कीं ती आज विश्वज्ञानाचीच भाषा (encyclopaedic) झाली आहे. जगांतील सर्व प्राचीन, अर्वाचीन, मध्ययुगीन व आधुनिक कला व शास्त्रें इंग्रजींत केन्द्रित झालीं आहेत. आधुनिक विचार प्रकट करावयाला अत्यंत सामर्थ्यशाली माध्यम इंग्रजी भाषा होय. आधुनिक युगधर्म आत्मसात करायचा असेल, जे जे कांहीं महान (विचार व कृति) जगांत होऊन गेलें असेल तें अवगत करून घ्यावयाची वृत्ति जर अंगीं बाणवावयाची असेल तर इंग्रजी येणें हें अपरिहार्य आहे. म्हणून आपल्या उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत इंग्रजीचें चांगलें ज्ञान प्रत्येक विद्यार्थ्याला असलें पाहिजे अशी व्यवस्था झाली पाहिजे. चांगलें ज्ञान याचा अर्थ असा कीं, विद्यार्थ्यांना इंग्रजी चांगलें वाचतां येऊन समजलें पाहिजे व इंग्रजी भाषेंत शुद्ध व परिणामकारक रीतीनें आपले विचार प्रकट करतां आले पाहिजेत.

बंगाली भाषेसंबंधी मी सांगूं शकतो. गेल्या १०० वर्षांत जे उत्तम बंगाली लेखक होऊन गेले ते इंग्रजीचे उत्तम पंडित होते. बंगाली भाषेच्या रोमरोमांतून आढळून येणारे आधुनिक विचार आणि आधुनिक दृष्टि लेखकांच्या इंग्रजीवरील प्रभुत्वामुळेंच प्राप्त झालीं आहेत. त्यामुळें बंगाली वाङ्मय अतिशय समृद्ध झालें असून बंगाली भाषेला अत्यंत आधुनिकांतला आधुनिक विचार प्रकट करण्याचें सामर्थ्य आलें आहे. म्हणून माझ्या मतें, माध्यमिक शाळांपासून पुढें इंग्रजी हा विषय आवश्यक ठेवावा. अर्थात् ज्या विद्यार्थ्यांना पुढें उच्च शिक्षण घ्यावयाचें नाहीं, लहानसहान धंद्यांचें शिक्षण घ्यावयाचें आहे, त्यांना इंग्रजी आवश्यक ठेवलें नाहीं तरी चालेल.

सर्व शिक्षण — अगदीं उच्चतम शिक्षणदेखील — मातृभाषेंतूनच झालें पाहिजे हें डॉ. कर्वे यांचें म्हणणें मला मान्य आहे. परंतु सध्यांच्या परिस्थितीचा विचार करतां इतर बाह्य जगाशीं आपला संबंध तुटायचा नसेल तर शास्त्रें आणि सांस्कृतिक विषयांचे अभ्यासक्रम यांचें शिक्षण दोन भाषांच्याच आधारें करणें इष्ट व व्यवहार्य होईल. म्हणजे मातृभाषेंतून शिक्षण द्यावयाचें पण शास्त्रीय पारिभाषिक शब्द नेहमीं इंग्रजीच ठेवायचे असें करावें लागेल. भारतीय भाषांतील पारिभाषिक शब्द वापरण्याची प्रक्रिया ही हळुंहळुं क्रमानेंच व्हायला पाहिजे. नाहींतर घिसाडघाईनें सबंध शिक्षणाचीच








अनुक्रमणिका

घडी विस्कटून गोंधळ माजेल. पारिभाषिक शब्दांच्या बाबतींत, विशेषतः भौतिक शास्त्रांतील परिभाषेच्या बाबतींत आपण आपली मनोवृत्ति उदार ठेविली पाहिजे. जास्तींत जास्त संग्राहक वृत्ति बाळगली पाहिजे. आधुनिक शास्त्रें व त्यांच्या 'प्रयोगशाळा' या आपण पाश्चात्त्यांकडूनच घेतल्या आहेत. म्हणून चिन्तनशील तात्त्विक शास्त्रांची आणि 'प्रयोगशालां'ची बरीचशी परिभाषा युरोपकडून, विशेषतः इंग्लंडकडून आपण घेणें क्रमप्राप्त आहे. भाषेच्या बाबतींत सोंवळेपणाची, 'अस्पृश्यते'ची वृत्ती सोडली पाहिजे. नवीन संशोधनांत आढळून येणाऱ्या गोष्टी व त्यांची प्रक्रिया यांची परिभाषा इंग्रजीच ठेवावयास हरकत नसावी. तत्त्वज्ञान किंवा इतर विचारप्रधान विषयांच्या बाबतींत आपण आपली स्वतःची परिभाषा वापरावयास हरकत नाहीं. परंतु तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतदेखील युरोपमध्यें कांहीं विशिष्ट पारिभाषिक शब्द प्रचारांत आले आहेत. उदाहरणार्थ, प्लेटोच्या 'आयडिआज्', प्रॅग्मॅटिझम्, आयडिआलिझम्, डायलेक्टिकल मटीरिआलिझम्, पॉझिटिव्हिझम् अशासारख्या शब्दांचा अर्थ दुसरे शब्द वापरून अचूकपणें व्यक्त करणें शक्य नसतें. म्हणून अशासारखे शब्द आपण आपल्या तत्त्वज्ञानपरिभाषेंत स्वीकारायला हरकत नसावी.

सारांश, एकंदर सर्व गोष्टींचा विचार करतां, आपल्या शिक्षणपद्धतींत कोणत्या भाषांचा अवलंब करावा या बाबतींत पुढील सूचना कराव्याशा वाटतात

(१) प्रादेशिक भाषेंतून किंवा मातृभाषेंतून सर्व शिक्षण — उच्चतम शिक्षणदेखील — दिलें जावें.

(२) जे विद्यापीठांत प्रवेश करणार असतील, त्यांना इंग्रजी ही परकीय भाषा आवश्यक ठेवावी. कॉलेजांतून इंग्रजी पाठ्यपुस्तकें ठेवावींत. वर्गांत शिकवतांना दोन भाषांचा अवलंब करावयास परवानगी द्यावी; आज तर तसें करावयास प्रोत्साहनदेखील द्यावें.

(३) अँग्लो-इंडियनांसारखे जे घरींदेखील इंग्रजी बोलत असतील त्यांना इंग्रजींतून शिकवावें. परंतु हायस्कूल-शिक्षणांत व त्यानंतर त्या त्या प्रादेशिक भाषेचा अभ्यास एक महत्त्वाचा विषय म्हणून त्यांनीं केलाच पाहिजे.

(४) डॉ. इरावती कर्वे यांनीं, ज्यांचीं मातृभाषा इंग्रजी आहे, अशा भारतीय नागरिकांच्या बाबतींत असें सुचविलें आहे कीं त्यांना अनुकूल करून घेऊन त्यांना हळुंहळुं प्रादेशिक भाषेचा स्वीकार करावयास लावावें. या त्यांच्या सूचनेंत बरेंच तथ्य आहे यांत शंका नाहीं. पण ही परिस्थिति अमलांत यायला बराच काळ जावा लागेल. तोंपर्यंत या लोकांवर कोणत्याहि प्रकारची सक्ती असतां उपयोगी नाहीं.

(५) डॉ. कर्वे यांनीं अशी सूचना केली आहे कीं, कोणत्याहि घटक राज्यांतून शाळा व कॉलेजें यांवर परकीय मिशनऱ्यांचें वा कोणा अ-भारतीय माणसांचें नियंत्रण असूं नये, ही सूचना मला पूर्णपणें मान्य आहे. मिशनऱ्यांनीं चालविलेल्या संस्थांतून, जे घरीं देखील इंग्रजींतून व्यवहार करतात असे कांहीं अँग्लोइंडियन्ससारखे लोक वगळून, इतरांना इतर शिक्षणसंस्थांतल्याप्रमाणें प्रादेशिक भाषेंतून शिक्षण दिलें पाहिजे.

(६) विद्यापीठांत ज्यांना पुढें सांस्कृतिक विषयांचा (Arts) अभ्यास करावयाचा आहे त्यांना संस्कृतसारखी प्राचीन भाषा हायस्कूलमध्यें आवश्यक ठेवावी.

(७) कॉलेजशिक्षणाच्या आधीं हिंदी आवश्यक ठेवूं नये. विशेषतः अखिल भारतीय नोकऱ्यांकरितां जे अभ्यास करतील त्यांना हिंदी आवश्यक ठेवावी. अखिल भारतीय नोकऱ्यांकरितां अ-हिंदी भाषिक विद्यार्थ्यांना हिंदी आवश्यक केली गेली, तर त्याचबरोबर हिंदी भाषिक विद्यार्थ्यांना भारतीय संघराज्यानें मान्य केलेल्या भाषांमधून हिंदी व उर्दू यांशिवाय कोणती तरी एक भाषा आवश्यक ठेवावी.

(८) परकीयांसमोर आपल्या स्वाभिमानरक्षणाकरितां म्हणून हिंदी ही राष्ट्रभाषा समजली जावी. हल्लीं तरी हिंदीला, हिंदीतर भाषिकांच्या दृष्टीनें, केवळ मिरविण्याचें साधन किंवा अलंकार याशिवाय जास्ती किंमत नाहीं. विद्यापीठीय उच्च शिक्षणांत, कायदेशास्त्र व राज्यकारभार याबाबतींत इंग्रजीची जागा हिन्दी घेऊं शकणार नाही. मध्यवर्ती लोकसभेंतदेखील, जेव्हां हिन्दीतर भाषिक सदस्यांपैकीं शेंकडा ८० सदस्य लोकसभेंत इंग्रजीऐवजीं हिंदींतून भाषण करावयाचें स्वखुषीनें पसंत करतील, तेव्हांच हिंदी ही राज्यकारभाराची वा सरकारदरबारची भाषा म्हणून उपयोगिली जावी. नाहींतर अनेक अडचणी उत्पन्न होऊन भारताच्या लोकसभेंतील कामच थांबेल!

भारतीयांत हिंदीचा अभ्यास व प्रसार होण्याची गरज नाहीं, असे डॉ. इरावती कर्वे यांना सुचवावयाचें आहे. तसें मात्र मला वाटत नाहीं. माझ्या मतें, हिंदीभाषिकेतर लोकांत

जसा हिंदीचा प्रसार झाला पाहिजे, तसाच व त्याचबरोबर हिंदी भाषिकांत हिंदी किंवा उर्दूशिवाय इतर भारतीय भाषेचाहि प्रसार होणें आवश्यक आहे.

भाषेपेक्षां जीवन अधिक महत्त्वाचें आहे. सर्व जगांत एक राज्य, सर्व जगांत एक जागतिक संस्कृति या ध्येयाकडे आपलीं पावलें वेगानें पडत आहेत. अशा वेळीं इंग्रजीला बिचकण्याचें कारण नाहीं. आज आपल्यापुढें हिन्दी व इंग्रजी दोन्हीहि आहेत. परंतु इतिहासप्राप्त परिस्थिति अशी आहे कीं, आज अखिल भारतांत तसेंच परराष्ट्रीय व्यवहारांत इंग्रजीला अधिक महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें आहे. अशा परिस्थितींत इतर भारतीय भाषांपेक्षां हिंदीमध्यें गुण व संख्या या दृष्टीनें विशेष श्रेष्ठत्व आढळून आलेलें नसतां, हिंदीला इतर भाषांच्यापेक्षां उच्चासनावर नेऊन बसविणें हें भारतीय ऐक्यसंवर्धनास पोषक होणार नाहीं. आपल्या जीवनांतील हरएक दालनांतून कितीतरी पाश्चात्त्य गोष्टी रुळलेल्या दिसून येत असतांना, इंग्रजी भाषा चालूं ठेवण्यानें आपली राष्ट्रीय भावना दुखावेल असें समजण्याचें कारण नाहीं.

भारतीय विद्यार्थ्याला ज्या अनुक्रमानें भाषा शिकवाव्यात असें मला वाटतें तो क्रम असा : (१) मातृभाषा (२) इंग्रजी (३) प्राचीन (संस्कृत) भाषा (निवडक विद्यार्थ्यांकरितां) (४) मातृभाषेशिवाय एक भारतीय भाषा. हिंदीतर भाषिकानें हिंदीच घेतली पाहिजे. ज्यांची मातृभाषा इंग्रजी आहे त्यांनीं इंग्रजीशिवाय एक प्रादेशिक भाषा शिकली पाहिजे.

## हिन्दी आणि कांहीं इंग्रजी*

- श्री. मास्ती वेंकटेश आयंगार

प्रस्तुत भाषाविषयक प्रश्न असा आहे कीं त्यावर कितीहि विस्तृत चर्चा केली तरी मतैक्य होईल असें नाहीं. म्हणून प्रा. इरावती कर्वे यांनीं उपस्थित केलेल्या मुद्द्यांबाबत चर्चा न करतां त्याबाबतची माझी भूमिका संक्षिप्तपणें मांडतों :

(१) आपल्या भारतीय घटनेंत ज्या भाषांचा निर्देश केला त्या सर्वच भाषा चांगल्या विकसित आहेत. त्यांच्यात आपला सर्व भारत येऊन जातो. त्या त्या प्रदेशाच्या भाषेचा उपयोग त्या प्रदेशांत सर्व कामांकरितां केला जावा : शिक्षण, राज्यकारभार, कोर्टें, व्यापार इत्यादि. किंबहुना, लोकांना ज्या ज्या कामाकरितां भाषेची गरज लागते त्या त्या सर्व कामांकरितां प्रादेशिक भाषा उपयोगांत आणिली जावी.

(२) अखिल भारतीय कामकाजाकरितां सर्वांची एक भाषा हिन्दी ही असावी. आज या कार्याकरतां हिन्दी जरी विशेष समर्थ दिसत नसली, तरी आपल्या सर्वांच्या वापरण्यामुळे पुढें तिच्यांत सामर्थ्य येईल.

(३) इंग्रज राज्यकर्ते असतांना इंग्रजी जशी सर्वांची एक भाषा होती, तशी ती आतां होऊं शकणार नाहीं. ज्या परिस्थितींत आपल्या राष्ट्रानें इंग्रजी भाषा स्वीकारली होती ती परिस्थिति संपूर्णपणें शंभर टक्के कृत्रिम होती. ती परिस्थिति आज उरलेली नाहीं.

(४) पण जगाशीं आपलें दळणवळण ठेवण्याकरितां कांहीं प्रमाणांत आपण इंग्रजी ठेविलें पाहिजे. आपणांपैकीं कांहींनीं तर फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश, रशियन, इटालियन, जपानी, चिनी, ब्रह्मी या भाषांचा अभ्यास केला पाहिजे.

(५) मातृभाषेशिवाय इतर भाषा 'डायरेक्ट मेथड'नें शिकवाव्यात. त्या भाषांतून सामान्यपणें बोलतां येणें, सर्वसाधारण बोललेलें समजणें, पत्रें-वृत्तपत्रें वाचतां येणें एवढाच या इतर भाषांच्या अभ्यासामागें हेतु असावा. अर्थात् ही सूचना करतांना माझ्या नजरेपुढें सर्वसामान्य बहुसंख्य विद्यार्थी आहेत. जसे कांहीं विद्यार्थी विज्ञान किंवा तत्त्वज्ञान यांना वाहून घेणारे निघतात, त्याचप्रमाणें इतर कांहीं विद्यार्थी भाषेवर प्रभुत्व संपादन करण्याच्या किंवा त्या भाषेंत साहित्यविषयक कामगिरी करण्याच्या हेतूनें भाषांचा अभ्यास करणारे निघतीलच.

(६) माध्यमिक (Secondary) शाळांच्या अभ्यासक्रमांत आरंभीं हिंदीचा समावेश व्हावा, नंतर इतर भाषा ठेवाव्यात.

●●

* मूळ इंग्रजींतून पाठविलेल्या टिपणाचा हा अनुवाद आहे. - का.सं.

अनुक्रमणिका

# निवेदन

## चर्चासत्र

*नवभारत*च्या जानेवारी २००२ च्या अंकातील श्री. वसंत पळशीकर यांच्या 'एकोनिसाव्या शतकातील महाराष्ट्र' या समीक्षा लेखाच्या संदर्भात हे पत्र लिहीत आहे.

लेख चांगलाच प्रदीर्घ आहे (पृ. ८ ते ३४) व समीक्षा केलेल्या ग्रंथातील (*'आधुनिकता आणि परंपरा : एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र'* - प्रा. य.दि. फडके गौरव ग्रंथ) लेखकही तोलामोलाचे आहेत. या समीक्षा लेखातील अनेक विधानांविषयी वाद होऊ शकतो; व 'तत्त्वबोधा'साठी तो होणे आवश्यक आहे असे मला वाटते.

श्री. वसंत पळशीकर यांच्या समीक्षेचे मुख्य सार त्यांच्या लेखाच्या दहाव्या भागात आले आहे असे मला वाटते. या साराचेही सार खालील वाक्यात प्रकट झाले आहे.

श्री. पळशीकर लिहितात :

"सोविएत संघराज्याचे विघटन आंतरिक विसंगती, उणेपणा, कच्चेपणा यांच्या पोटी होते, आणि जिची मृत्युघंटा वाजत असल्याबद्दल वेळोवेळी घोषणा केल्या जात आल्या आहेत ती भांडवलशाही जोम प्रकट करीत प्रभुत्व गाजवीत राहते; याचे रहस्य यात तर नाही ना, की डावा विचार हा 'जखडबंद सनातनी' ('ऑर्थोडॉक्स' व 'डॉग्मॅटिक') राहिलाय तर, भांडवलशाही ही आव्हानांना झेलत, बदलत राहण्याइतकी लवचिक व नित्यनूतन राहिल्याने, ती कात टाकून पुन्हा नव्या जोमाने फोफावत राहिलीय?

'... आजच्या आघाडीवरच्या क्रियाशील विचारवंतांपुढे अधिक सम्यक, समग्र व मार्मिक अन्वेषणदृष्टी व पद्धती विकसित करण्याचे आव्हान कालपुरुषाने उपस्थित केले आहे... त्यांनी हे आव्हान ओळखावे व ते समर्थपणे झेलावे. समाजवादाच्या युगधर्माचा अस्त व्हायचा नसेल तर हे शिवधनुष्य पेलल्याशिवाय गत्यंतर नाही." (पृ. ३४)

'अवसर आणि आव्हाने यांनी तुडुंबलेला हा काळ आहे' असे बाबा आमटे यांनी आपल्या एका कवितेत म्हटले आहे असे मला आठवते. विचाराच्या क्षेत्रात तर हे आज विशेषच खरे आहे. यातून काही वाट सापडावी, निदान ती शोधण्याचा प्रयत्न तरी व्हावा अशी माझी मनापासूनची इच्छा आहे. असे प्रयत्न अनेकदा विफल होऊनही मी अजून आशावादी आहे. I am an incorrigible optimist.

म्हणून मी खालील रचना सुचवतो व तिच्या कार्यवाहीची जबाबदारीही स्वीकारतो. ती रचना अशी :

१. या विषयावर एक संपूर्ण दिवसाचे चर्चासत्र २८ डिसेंबर रोजी वाई येथे आयोजित केले जाईल.
२. आवश्यक तर दुसऱ्या दिवशीही ते पुढे चालवता येईल.
३. श्री. वसंतराव पळशीकर व ग्रंथातील लेखक या चर्चासत्रात प्रत्यक्ष भाग घेतील. आवश्यकतेप्रमाणे त्यांच्या प्रवास निवासादीची व्यवस्था केली जाईल.
४. अन्य कोणाला केवळ श्रोता म्हणून पूर्ण वेळ उपस्थित राहावयाचे असल्यास तशी अनुमती देता येईल. मात्र पूर्वसूचना आवश्यक.
५. चर्चा मर्यादेबाहेर भरकटत नाही व/वा तिला अनिष्ट वळण लागणार नाही एवढे पहावयास एक तटस्थ व्यक्ती असेल. व तिचा अधिकार त्या पुरताच मात्र असेल. ही निवड चर्चासत्रात भाग घेणाऱ्या सर्वांच्या सहमतीने करण्याचा प्रयत्न केला जाईल.

*नवभारतात* हे प्रकटन आपण देऊ शकल्यास मी आपला आभारी होईन.

१४.४.०२ — आपला
सातारा — **देवदत्त दाभोलकर**

अनुक्रमणिका








# सुराज्याची कल्पना

**प्रमोद बियाणी**

गेल्या वर्षी स्थानिक वर्तमानपत्रांमध्ये मी एक बातमी वाचली. नाशिकजवळच्या एका तालुक्याच्या गावी शिवपुतळ्याची विटंबना झाली होती, त्यामुळे तिथे दंगल सुरू झाली. दुसऱ्या जिल्ह्यातून येणाऱ्या एका एस.टी. बसला दंगलखोरांनी वेढा घातला. त्यांनी बस जाळण्याची तयारी सुरू केल्याने बसमधले प्रवासी घाबरले. सामानसुमान सोडून वेगाने बसमधून उतरून पळू लागले. सर्वात शेवटी एक अपंग महिला आपल्या लहान मुलांना घेऊन उतरत होती. अपंगत्वामुळे तिला धावता येईना. दंगलखोरांच्या कारवाईची झळ तिला सोसावी लागली. ती गंभीर जखमी झाली.

बातमी मी काळजीने वाचली; कारण बस माझ्या मूळ गांव असलेल्या आगाराची — पाथर्डी डेपोची — होती. पाथर्डी ते नाशिक बसची ही सत्य हकिगत. मी अत्यंत अस्वस्थ झालो. अपंग बाई जीवाच्या आकांताने कशी धावत असेल, तिची त्या लहान मुलांसह किती धांदल झाली असेल याचे चित्र डोळ्यांसमोर उभे राहिले.

मात्र मित्र म्हणाला, "हल्ली काही खरं नाही, घराबाहेर पडलेला माणूस घरी परतेलच आणि परतला तरी सुखरूपच परतेल याची काही खात्री नाही".

आपल्याच राज्यकर्त्यांच्या काळात आपल्याला जाणवणारी ही भीतिप्रद असुरक्षितता केवळ भयाण आहे. सुराज्य म्हणजे भव्यदिव्य काही नसले तरी किमान सुरक्षित जीवन एवढी अपेक्षा तर नक्कीच असते.

रामायणातील रामराज्य ही आदर्श कल्पना आहे. गांधीजींची अंत्योदयाची व सुराज्याची कल्पनाही आदर्श आहे. माझी सुराज्याची कल्पना खूप आदर्शवत नाही. ती किमान अपेक्षा ठेवणारीच आहे. कारण माणूस हा प्राणी संपूर्णतः सर्व संख्येने बदलणे केवळ अशक्य आहे. दुष्टावा हा मानवाचा स्थायीभाव आहे. संस्कारांनी माणसाची हिंसा, दुष्टावा व क्षुधा यांना मर्यादा घालण्याचा प्रयत्न केला जातो. असे असले तरी, नैसर्गिक भावनांवर संपूर्ण नियंत्रण सर्वांसाठी अशक्य असल्याने, निषेधार्ह वा नको असलेल्या बाबी घडतच राहणार. खून, दरोडे, चोऱ्या, भांडणे, द्वेष, मत्सर, स्पर्धा, लालसा हे सर्व काही जगाच्या अंतापर्यंत राहणार असल्याने त्यांना टाळून सुराज्याची कल्पना करूच नये. तसे झाल्यास ती कविकल्पना ठरते व अवास्तव कल्पनांच्या आकांक्षा धरल्याने नैराश्य दाटते.

मी निराशावादी नाही पण 'वास्तव आशावादी' असल्याने जे असेल ते आधी गृहीत धरतो. 'सु' हा प्रत्यय चांगला वा सकारात्मक आहे. उदा., सुकाळ, सुष्ट, सुवार्ता, सुरेख इत्यादी शब्दांना 'सु' हा प्रत्यय लागल्याने त्यांचा आशय सकारात्मक बनला आहे. राज्य या शब्दाला 'सु' हा प्रत्यय लावल्यास सकारात्मक आशय प्राप्त होतो. त्यामुळेच सुराज्याची कल्पना ही अपरिहार्यपणे चांगल्या राज्याची कल्पना बनते. सुराज्याची 'वास्तव आशावादी' कल्पनाच आपण मांडली पाहिजे.

'राज्य' ही संकल्पना राज्यशास्त्राच्या अभ्यासकांची आहे. राज्य म्हणजे राजकीयदृष्ट्या संघटित असलेला भाग आणि लोकसमूह होय. राज्य म्हणजे शासन, सरकार वा राज्यसत्ता होय. State या इंग्रजी शब्दाचा अर्थ 'A civil community having its own government and law; such a community forming part of federal republic; civil government' असा दिला जातो.

सुराज्याची व्याख्या मी पुढीलप्रमाणे करीन : "सुराज्य म्हणजे असे शासन असलेला लोकसमूह की जेथे त्या समूहातील अंतिम घटक सुरक्षित व समाधानी आहे".

लोकसमूहातील अंतिम घटक म्हणजे प्रत्येक माणूस होय. किमान समाधानासाठी सुराज्यात काय हवे याच्या अपेक्षांची यादी करता येईल. मात्र मानवाच्या जीवाची हमी आणि किमान सुरक्षिततेची भावना ही कोणत्याही समाधानाची सर्वप्रथम पूर्वअट असते. प्रस्तुत लेखाच्या सुरुवातीला दिलेले उदाहरण या पार्श्वभूमीवर तपासता येईल. दंगलखोरांनी अपंग बाईला घाबरवून सोडले आणि सुराज्याची सर्वप्रथम अटच






पायदळी तुडविली. सार्वजनिक स्थळी केव्हाही असुरक्षितता निर्माण होऊन जीवच धोक्यात येणाऱ्या राज्याला आपण सुराज्य म्हणणार आहोत काय? खरे तर, राज्याने म्हणजे राजाने, म्हणजेच शासनाने, जसे त्याच्या केंद्र-बँकेच्या गव्हर्नरच्या सहीने चलनसम किंमत अदा करण्याची हमी रुपयाच्या नोटेवर दिलेली असते तद्वतच स्वतःच्या राज्यातील मानवी जीवांची हमी स्वतःच्या कारभाराने द्यायची असते. सुराज्याची तीच तर केंद्रकल्पना आहे.

मानवी जीव, समूहाचे व व्यक्तीचे सुयोग्य हितसंबंध आणि संपत्ती रक्षणाची हमी सुराज्यात मिळायला हवी. शोषणापासून, दहशतीपासून आणि बहुतेक सर्व प्रकारच्या अत्याचार, अन्यायापासून संरक्षण देणे राज्याकडून अपेक्षित आहे. कायद्यांची निर्मिती त्यासाठी तर करायची असते.

दंगलीत पडणारे बळी, हुंडाबळी, श्रमचोरीतून केले जाणारे शोषण आणि भूकबळी हे सुराज्यात अपेक्षित नाहीत. जीवन एका गतीने चालू राहील याची शाश्वती सुराज्यात असते. अचानक होणाऱ्या दंगली, कृत्रिम टंचाई, केव्हाही होणारे कुठलेही संप, अस्थिर आणि केव्हाही कोसळणाऱ्या राजवटी किंवा स्थिर पण निरुपयोगी अर्थहीन राजवटी, स्त्रियांवरील अत्याचार आणि गरजा पूर्ण न झाल्याने त्रस्त झालेला समूहाचा भाग हे सर्व सुराज्याचे नव्हे तर दुराज्याचे लक्षण होय!

लोकसमूहाचा शेवटचा घटक (last unit) या अर्थाने प्रत्येक मनुष्यमात्राला शत्रू, दंगलखोर आणि अन्याय-अत्याचारकर्ते वा दहशतवादी यांच्यापासून संरक्षण देणे हे 'सुराजा'चे कर्तव्य आहे. स्वराज्यासाठी 'सुराजा' राज्यावर असला पाहिजे. जीवाची हमी देणे ही सुराज्याची पूर्वअट असली तरी तो जीव किमान समाधानाने जगण्यासाठी आवश्यक साधनसामग्री व वातावरणाची उपलब्धता करून देणे ही सुराज्याची लगेचच येणारी द्वितीय अट असते.

मानवाच्या किमान प्राथमिक गरजांची पूर्ती होऊ शकेल असे सामाजिक व सर्वस्तरीय वातावरण सुराज्यात अपेक्षित आहे. मात्र मानवाच्या स्वाभिमानाला — आत्मसन्मानाला — नाकारून सर्व गरजांची महत्तम पूर्ती झाली तरी त्याला सुराज्य म्हणता येणार नाही. कारण, भीतिमुक्तता हीच स्वाभिमानाचा पाया घालत असते. गरजांची स्वाभिमानशून्य मार्गाने होणारी पूर्ती ही पशुपातळीवर उतरते.

या अर्थाने पाहिले तर, चंगळवादी व भोगलोलुप जगण्याची रीत निर्माण करणाऱ्या राष्ट्रकांना सुराज्य म्हणता येणार नाही. सुराज्याची कल्पना ही भौतिकवादापेक्षा अध्यात्माच्याच जवळ जाणारी आहे. मानवी जीवाच्या हितचिंतनाचा आशय सुराज्याच्या संकल्पनेशी जोडलेला आहे. त्यामुळेच युद्धखोरीने ग्रासलेल्या आजच्या जगात सुराज्य म्हणजे काय याचा तरतमभावाच्या पलीकडे जाऊन तरल पातळीवर विचार होणे आवश्यक बनले आहे.

काही झाले तरी, सुराज्य संकल्पनेतील चिंतनाचा केंद्रबिंदू, माणसाचे सुख-समाधान हेच असणार आहे. ते सुख-समाधान सापेक्ष व्याख्येने ठरणार असले तरी भीतिमुक्तता हाच त्यापैकी कोणत्याही व्याख्येचा गाभा असणार हे निश्चित.

●●










# प्रेमी युगुल

वसंत पळशीकर

(*समिधा* – साधना आमटे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २००१, रु. २००)

बाबा आमटे अचाट ताकदीचे व्यक्तिमत्त्व आहे. त्यांचे डोके अतिशय कल्पक आहे. त्यांचे व्यक्तित्व अनेक विरोधाभासांनी समृद्ध आहे. त्यांच्या पहिल्या, रमेश गुप्तांनी शब्दांकित केलेल्या कवितासंग्रहाचे नाव *ज्वाला आणि फुले* आहे. एकच दुरुस्ती करायला हवी. ज्वाला आणि फुले अशा दोन वेगवेगळ्या गोष्टी त्यांच्या ठायी एकत्र आढळतात असे नाही; ज्वालाच फुले आहेत आणि फुले ज्वाला. पौर्णिमेच्या चांदण्याची शीतलता आणि माध्यान्हीच्या उन्हाळ्यातील सूर्याचा भाजून काढणारा जाळ एरवी आपण वेगवेगळा अनुभवतो. बाबांच्या सान्निध्यात हा एकवटच अनुभव येतो. नायगराचा जगविख्यात धवधवा छायाचित्रात पाहिलाय. तो अखंड त्याच्या प्रमाथी ताकदीने व आवेगाने कोसळत असतो. तो अंगावर झेलणाऱ्याच्या अंगात मात्र पाय घट्ट रोवून उभे राहण्याचे आंतरिक बळ हवे. (बाबांचे बोलणे हादेखील एक प्रपातच असतो.) बाबांच्या अंतर्यामी हर क्षणी गूढ आण्विक स्फोटसदृश प्रक्रियेद्वारा ऊर्जेचा स्फोट होत असतो. त्यांचे आंतरिक सामर्थ्य आणि त्यांना अपार वेदना अनुभवायला लावणारी व्याधी याही अशाच एकवट गोष्टी आहेत. एक नसली तर दुसरी पण असणार नाही, असे काही अगम्य असे जैव नातेच त्या दोहोंमध्ये आहे.

निसर्गातील चमत्कार म्हणावा अशा बाबांना, त्या वेळी मुरलीधर देवीदास आमटे नावाच्या, सभोवतालच्या मंडळींना एक कोडेच असलेल्या तरुणाला, स्वतःच्या अंगच्या उत्कट भावनांच्या (passions) चुंबकीय शक्तीने साधनाताईंनी – त्या वेळी 'इंदू' असलेल्या – स्वतःकडे खेचून घेतले; पण खेचून घेणारी व्यक्ती त्या ओघात स्वतःवरचा ताबाही हरवून बसलीच. सारीच ईश्वरी योजना म्हणावी अशी. किमान अलौकिक घटना तर खासच. *समिधा* या स्वतःच्या कहाणीत साधनाताईंनी त्याचे केलेले वर्णन 'प्रथमदर्शनी प्रेमा'ची गोष्ट सांगते. पण या गोष्टी तशा गूढच राहतात. इंग्लिश कादंबरीकार डी.एच. लॉरेन्स यांच्या पत्नीने लिहिलेल्या त्यांच्या सहजीवनाविषयीच्या पुस्तकाचा मथळा 'Not I But the Wind' असा आहे; मथितार्थ असा की, 'लॉरेन्सकडे मी ज्या ओढीने खेचले गेले ते माझे कर्तृत्व नव्हते, ती गोष्ट खोलवर आतून कोठून तरी आली' असे त्यांचे म्हणणे.

आमटे रगेल, उत्कट व छांदिष्ट, 'हिरो' छाप, धाडसी म्हणून एका वर्तुळात 'नावाजलेले' असणार हे उघड आहे. नट्यांशी पत्रव्यवहार हा त्यांचा एक छंद. पन्नास वर्षांपूर्वी आनंदवनातल्या त्यांच्या घरात एका सुविख्यात पाश्चात्त्य नटीचा स्वाक्षरीसहित फोटो होता. सुबत्ता असलेल्या जमीन-दाराच्या घरातील, वैदर्भीय मालगुजारी संस्कृतीत मुरलेल्या तरुणाचे परिचित असे मोठे पौकिन, सौंदर्यासक्त व वेधडक असे आमट्यांचे त्या काळी व्यक्तिमत्त्व होते. (ही छाप त्यांच्या सांगण्यावरूनच उमटलेली आहे.) या तरुणाच्या आतमध्ये एक प्रचंड, उत्पाती बेचैनी व त्यातून येणारा असा स्वतःच्या स्वत्वाचा निरंतर शोध हे दोन घटक जन्मजात होते; पाचवीला पूजलेले राहणार होते.

आमट्यांच्या मुरलीच्या मुलुखावेगळ्या स्वभावाची, व्यक्तित्वाची व जगण्याच्या शैलीची काही चुणूक साधनाताईंना – खरे तर इंदूला असेच म्हणावयास हवे – लग्नाआधी अनुभवायला मिळाली. हा आत्मशोधाचा अस्वस्थ, धगधगता प्रवास पूर्ण झाला असे कधीच म्हणता येणार नाही. अशा एका शांत न होऊ शकणाऱ्या, विझू न शकणाऱ्या वादळाशी वा वणव्याशी आयुष्यभर संसार करावयाचे हे भविष्य साधनाताई पाहू शकल्या नसणारच. नाही कल्पना करू शकल्या तेच ठीक झाले.

आमट्यांचा स्वचा शोध म्हणजे स्वची निर्मितीही होती; अखंडपणे निर्मिती करीत राहूनच लागला तर त्यांना स्वतःचा









अनुक्रमणिका

शोध लागणार होता. हे त्यांच्या वाट्याला आलेले विधिलिखित होते. इंदूताईंच्या 'साधनाताई' कधी झाल्या त्याची मला माहिती नाही. लग्नात आमट्यांनी त्यांचे हे नाव ठेवले असेलही, पण अनेक वर्षे इंदूताई या नावानेच त्यांना सर्व ओळखत. पण 'साधनाताई' हे नाव सार्थ मात्र आहे. कारण त्यांचे लग्नच अशा माणसाशी लागले की, अटळपणे, त्यांचीही अखंड आध्यात्मिक साधनाच चाललेली आहे.

आता शरीर थकलेय. व्याधींनी ग्रस्तही आहे. आठवण दगा देते. (याचा प्रत्यय प्रस्तुत पुस्तक वाचताना येतो. विकास व प्रकाश दोघे वरोड्यास प्राथमिक शाळेत होते; नारायण, रेणुका, विजली यांची कुटुंबात भर पडत गेली; शंकरदादा बाबांच्या तालमीत तयार होत असलेले उत्साही व मोठे समजूतदार तरुण होते; आनंदवनची जंगल-जमीन नुकतीच शेतजमिनीमध्ये रूपांतरित होत होती. याच काळात सर्विस सिव्हिल इंटरनॅशनल या युरोपीय युवक स्वयंसेवक संघटनेच्या टोळीने तीन महिन्यांच्या शिबिरात आनंदवन वसाहतीच्या पहिल्या तीन पक्क्या इमारतींचे व एका मोठ्या विहिरीच्या खोदाईचे काम कुष्ठरोग्यांच्या सहभागाने व वरोडा गावातील मंडळींच्या उत्साही हातभाराने केले. त्या आसपास तीनचार वर्षे आमट्यांच्या कुटुंबातला एक बनून राहण्याचे मोठे भाग्य मला लाभले.) काही आठवणीत राहते, काही राहत नाही; स्मृतिपटलावर जे कोरले जाते ते मध्येच पुसट होते. वेगवेगळ्या घटनांची-प्रसंगांची सरमिसळ होते. या सगळ्याची नोंद साधनाताईंनी घेतली आहे. आनंदवनचा इतिहास किंवा आमट्यांचे चरित्र म्हणून वस्तुनिष्ठतेची कसोटी *समिधा*ला लावू नये. तसेच स्त्रीवादी भूमिकेतून साधनाताईंच्या लेखनाची कोणी परीक्षा करू नये.

या आत्मकथनाची तीन वैशिष्ट्ये माझ्या मनात ठसली. एक, साधनाताईंचे उत्कट भावनावेगशील (passionate) व्यक्तित्व होते तसेच राहिले आहे. त्याच वेळी, ते भारतीय संस्कृतीत मुरलेल्या सुजाण, क्षमाशील व वत्सल स्त्रीचे, मातेचे व पत्नीचे व्यक्तित्व आहे, हे पुरते अनुभवाला येते. समाजापुढे बाबांचे अचाट कर्तृत्व, गरूडझेप आणि प्रतिभा-विलास आहे. आणि या 'हिमालया'ची सावली म्हणजे साधनाताई असे वरकरणी दृश्य आहे. पण, सतत संघर्ष करणाऱ्या, अनेक दिशांनी खेचणाऱ्या, परस्परांशी मेळ पूर्णतया न बसणाऱ्या ऊर्मी त्यांना आतून सारख्या जणूकाही धडका देत असतात अशा बाबांसारख्याच्या व्यक्तित्वाला एक अंगभूत धोका सदैव असतो. अशा व्यक्तीची सर्जनशीलता विनाशकारी, प्रलयंकारी वळण पाहाता पाहाता घेऊ शकते. त्यात त्या व्यक्तीचाही विनाश होतो. (नेहमीच लौकिक अर्थाने नाही.). अशा व्यक्तीशी अखंड द्वंद्वात्मक 'संवाद' करीत, तिला अनेक वेगवेगळ्या बाजूंनी आधार देत, तिची पुष्टी करीत व तिची हिंमत, हुरूप कायम ठेवीत, तिला तोलून धरणारी एक 'पर' व्यक्ती ('the other') अत्यावश्यक असते. अशी व्यक्ती पुष्कळदा पडद्याआड राहते, आणि त्यामुळे ती दुबळी भासते. पण अशा, एका अंगाने गौणत्व पत्करणाऱ्या व्यक्तीचे अंत:सामर्थ्य या प्रक्रियेमधून वाढत जात राहते. 'सावली', *समिधा* हे शब्द हे चकवे ठरतात. सोसण्याशी या अंत:सामर्थ्याचा जैव संबंध दिसतो. साधनाताईंचे हे तिसरे वैशिष्ट्य मनावर ठसते.

*समिधा* वाचताना साधनाताईंनी जागोजाग खुणा ठेवलेल्या आहेत, ज्यांवरून असे ध्यानात येते की, बाबांचा व त्यांचा संबंध अखंड ताण-संघर्षमय राहिला आहे. आणि बाबांचे व्यक्तित्वच असे काही मनस्वी, झक्की, आग्रही, झंझावाती आहे की त्यांच्या अगदी निकट पोचणाऱ्या व्यक्तींचा संबंध त्यांच्याशी सुतासारखा मऊ व सरळ राहू शकतच नाही. साधनाताई तर सर्वांत आतल्या वर्तुळात आहेत; आणि तिथे त्या व बाबा, दोघेच आहेत. अखंड धगधगत्या व्यक्तित्वाच्या सान्निध्यात त्या एव्हाना जळून खाक कशा झाल्या नाहीत? याचे रहस्य या दोघांचे परस्परांवरचे, चिरतरूण राहिलेले प्रेम. हे प्रेम गोड-गुलाबी (ना.सी. फडके छाप, वा वि.स. खांडेकर छापही) नसते. ते प्रेमही रक्त आटवणारे, वेदना-व्यथांनी ओतप्रोत असते. त्याच वेळी त्याचे एक रूप तृप्तीचा अनुभव देणाऱ्या संततधार पावसाचे असते. याचेही मोठे मनोज्ञ ओझरते निर्देश साधनाताईंच्या कथनात आहे.

या पुस्तकाचा मला मोठा आनंद देणारा भाग यातली आनंदवनाच्या आरंभीच्या काळातील आमटे कुटुंबीयांची छायाचित्रे हा आहे. त्या आरंभीच्या काळात अजून ते भारतभर व भारताबाहेर सुविख्यात व्हायचे होते; सगळ्या गोष्टींना कौटुंबिक परिमाण होते. कुष्ठरोग्यांसह, आनंदवन हे एक कुटुंबच होते. ख्यातकीर्त सार्वजनिक व्यक्तित्वाचे परिमाण प्राप्त झाल्यावर अशी व्यक्ती स्वत:ची राहात नाही; जगाच्या नाना मागण्या, अपेक्षा ताबा घेऊ लागतात. उदाहरणच

द्यायचे झाले तर, १९५१ सालच्या आधीचे विनोबा आणि भूदान आंदोलनाने अमेरिकेतल्या सुप्रसिद्ध *टाइम* साप्ताहिकाच्या मुखपृष्ठावर आलेले विनोबा यांच्यातल्या अंतराचे देता येईल. १९५४ नंतर बाबांच्या कामाचा पसारा सतत वाढतच गेला आहे. त्याची बऱ्यापैकी ओळख साधनाताईंच्या आत्मकथनातून येते. या वाढत्या कार्यकर्तृत्वात एका टप्प्यावर विकास व प्रकाश या त्यांच्या दोन मुलांच्या कार्यकर्तृत्वाची ठळक भर पडली. त्यांचे सार्थ कौतुक मातृहृदयी साधनाताईंनी भरभरून केले आहे. १९५३-५५ या काळातले बाबा-साधनाताईंचे फोटो, त्यांनी मला खिळवून ठेवले. त्या दिवसांत घरातल्या कामांमध्ये अखंड बुडलेल्या, नाना कष्ट उपसणाऱ्या (त्या वेळच्या) इंदूताई आणि कुष्ठरोग्यांना त्यांच्या शारीरिक व मानसिक पंगुत्वावर मात करण्याचे शिकवून, आत्मसन्मानाने, उभारीने आनंदवनची उभारणी करण्यात त्यांना सहभागी करून घेण्यात रमलेले बाबा. त्यांच्या सहजीवनाच्या अखंड प्रेमयात्रेच्या रोमान्सचा तो काळ हा उच्च बिंदू होता असे त्या छायाचित्रांमधील चेहऱ्यांवरचा निरागस, कृतार्थ गोडवा पाहून मनात आले.

●●

---

### लेखक परिचय


❖ **प्रमोद वियाणी** : यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठामध्ये वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखेत प्राध्यापक.
**पत्ता** : २ लक्ष्मी विलास, खतीब डेअरी मागे, गंगापूर रोड, नाशिक ४२२ ००५.


---

### चुकीची दुरूस्ती

ऑक्टोबर २००१ पासूनच्या *नवभारत*च्या अंकांवर **वर्ष** ५६ असे छापले जात आहे. वस्तुतः ऑक्टोबर २००१ ते सप्टेंबर २००२ हे नवभारतचे **५५ वे वर्ष** आहे.

कविवर्य सतीश काळसेकर यांनी ही गंभीर चूक आमच्या नजरेस आणून दिली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत. नवभारतच्या वर्गणीदार व वाचक यांची माफी चाहतो.

एप्रिल २००२ च्या अंकापासून दुरूस्ती करून घेतली आहे.

- *संपादक*





अनुक्रमणिका

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मद्रा २/२ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका



